

# षटचक्र निरुपण

## संस्कृत - मराठी

सौ. मानसी वैद्य,ठाणे

अथ तंत्रानुसारेण षट चक्रादिक्रमोग्दत: ।

उच्चते परमानंद निर्वाह:प्रथमाक्ङुर: ।।--।।

आता मी (पहिल्या पायरीचे) पसरलेल्या योगवृक्षाच्या ब्रह्मस्वरूप जाणण्याच्या व प्राप्त करण्याच्या तंत्रशास्त्र मार्गाचे विवरण सहा चक्रांच्या व इतर माध्यमाने प्राप्त करण्याविषयी अनुक्रमे सांगतो.

सहा चक्रे हि मूलाधार स्वधिस्थान मणिपूर अनाहत विशुध्द व आज्ञा आहेत,ह्या विषयीचे ज्ञान गुरुशिवाय शक्य नाही,जे ह्या कुंडलिनी योगाबद्दल सांगण्यास समर्थ आहेत.जे ब्रह्मा-विष्णु-महेश्र्वर असून संस्कृत मधील श ष ह ह्या तीन अक्षरांनी त्यांस निर्देशित केले आहे.परमानंद हा अत्युच्च असून तो नित्य,ज्ञानरूप,आनंदमय आहे.इतर गोष्टी ह्या नाडी,लिंग,पाच भुते,शिव-शक्ती ह्याविषयी आहेत.

मेरोर्बाह्यप्रदेशे शशिमिहीरशिरे सच्यदक्षेनिषण्णेमध्ये

नाडी सुषुम्णा त्रितयगुणययी चन्द्रसूर्य्याग्निरूपा ।

धुस्तूरस्मेरपुष्पग्रथिततमवपु:स्कन्धमध्याच्छिर:स्था वज्राख्या

मेढ्रदेशाच्छिरासि परिगता मध्यमे म्याज्ज्वलन्ती ।।१।।

(नाड्या स्थूल नाहीत तर अध्यात्मिक आहेत ज्याचा साधना मार्गात उपयोग होतो)

(बाह्यप्रदेशे - बाहेरच्या जागेत,शशी-मिहीरा - चंद्र,सूर्य नाडया (इडा,पिंगळा),मेरू-मेरुदंड(मूलाधार ते गळा), सच्यदक्षेनिषण्णे - डाव्या उजव्या बाजूस, मध्येनाडी सुषुम्णा - त्याच्यामधोमध नाडी सुषुन्मा (हि नाडी मुलाधारापासून ब्रह्मरंध्रापर्यंत), त्रितयगुणययी - त्रिगुणात्मक (रज,तम,सत्व)एकात एक अश्या तीन नाड्या आहेत(चित्राणि-सत्व,वज्रा-राजस,सुषुन्मा-तामस), धुस्तूरस्मेरपुष्प - धोत्र्याच्या फुललेल्या फुलाची माळ असावी तशी, स्कन्धमध्याच्छिर:स्था - कंदापासून (लिंग व गुद(शिवण) ह्यातील

त्रिकोण,ह्यात लिंगाच्या मुळाखाली दोनबोटे व शिवणीवर दोन बोटे) डोक्यापर्यंत,कंद - मूळाची गाठ वज्राख्या मेढ्रदेशाच्छिरासि - त्यातील वज्रानाडी चमकणारी असून लिंगापासून डोक्यापर्यंत आहे)

मेरूच्या (मेरूदंड) बाहेरील जागेत डाव्या व उजव्या बाजूस दोन शिरा आहेत त्या चंद्र व सूर्य त्याच्या मध्ये नाडी सुषुन्मा (सु+सुमना = उत्तम+नादमय,उत्तम नाद संगम असलेली,जिच्यात तीन एकात एक नाड्या आहेत) असून ती तिन गुणांनी युक्त आहे ती सूर्य चंद्र व अग्नी स्वरूप आहे ती फुललेल्या धोत्र्याच्या फुलासारखी असून कंदापासून (मुलाधाराच्यागाठीपासून) डोक्यापर्यंत आहे,त्याच्या आतमधील (सुशुन्मेतील नाडी) वज्रानाडीचा पुढे लिंगापासून डोक्यापर्यंत विस्तार असून ती चमकणारी आहे.सुशुन्मा नाडी शंखिणी नाडी बरोबर कंदापासून गळ्यापर्यंत जाते, (शंखीणीला) जेथे दोन फाटे असून एक डाव्या कानाकडे व एक डोक्याकडे जातो,सुशुन्मा गळयानंतर भृकुटी मध्यात कुंडलिनीला मिळते व ब्रह्मरंध्राकडे जाते तेथे बारा पाकळ्या असलेल्या चक्रात विसावते.

तन्मध्ये चित्रिणी सा प्रणवविलासिता योगिनां योगगम्या

लूततन्तूपमेया सकलसरसिजान मेरूमध्यान्तस्थान् ।

भित्वा देदीप्यते तद् ग्रंथनरचनया शुध्दबोधस्वरूपा

तन्मध्ये ब्रह्मनाडी हरमुखकुहारादादिदेवान्तसंस्था ।।२।।

(तन्मध्ये चित्रिणी - त्यामध्ये (वज्रानाडीत) चित्रिणी,प्रणवविलासिता - मुलामा (प्रभेसारखी) दिल्यासारखी,प्रणवाचा (प्रभेसारखी) मुलामा दिल्याप्रमाणे-ती प्रणवाकडून तेज आज्ञाचक्रातून जाताना घेते ,लूततन्तूपमेया- ती कोळ्याच्या तंतुप्रमाणे (कोळ्याच्या जाळ्याचा तंतू) आहे,जी चमकते, सकलसरसिजान मेरूमध्यान्तस्थान् - ती सर्व कमळे (चक्रे) भेदून जाते,तन्मध्ये ब्रह्मनाडी - त्यामध्ये (चित्राणि नाडीत असणारी) ब्रह्मनाडी आहे,ज्यातून कुंडलिनी मुलाधारातून परमशिवांकडे जाते,हि कुंडलिनी शब्दब्रह्मस्वरूप आहे; हरमुखकुहारादादि- मूलाधारात स्वयंभू लिंग आहे त्याच्यावरील (वरीलभाग) बिंदूतून ,तेथुन अर्थात हरस्थानातून देवान्तसंस्था - परमशिवस्थानी जाते अर्थात डोक्यातील सहस्त्रचक्रात जाते)

ह्या नाडीत चित्राणी नाडी आहे जी प्रणवाचा मुलामा दिल्यासारखी आहे व ज्याने योगात योगी ज्यामार्गाने जातात अशी असून कोळ्याच्या जाळ्यातील दोऱ्यासारखी सूक्ष्म आहे,हि नाडी मेरूमार्गातील सर्व कमळे भेदून जाते हि शुध्दज्ञानरूप आहे,तिचे (चित्रांणी) सौदर्य हे तिच्यावरील कमळांमुळे खुलून

दिसते,तिच्या आत ब्रह्मनाडी असून ती हर येथून (मुलाधारातील स्वयंभू लिंगाच्या वरील बिंदुतून) (सहस्त्रातील)परमशिव स्थानी जाते.

-------- सुशुन्मा(अग्नीरूप लाल),---- वज्रा-बाहेरील(सूर्य,मुलामादिल्यासारखी),------ चित्राणि(चंद्र,शुध्द,सत्वगुणी,शुध्दज्ञानस्वरूप)फिकट,मध्ये आहे,,-----ब्रह्मनाडी -सर्वात आंत ज्यातून कुंडलिनी वर जाते.



विद्युन्माला विलासा मुनिमनासि लसत्तन्तुरूपा

सुसूक्ष्मा शुध्दज्ञानप्रबोधा सकलसुखमयी शुध्दबोधस्वभावा ।

ब्रह्मव्दारं तदास्ये प्रविलसति सुधाधारगम्यप्रदेशं

ग्रंथीस्थानं तदेतव्ददनमिती सुषुम्णाख्यनाड्या लपन्ति ।।३।।

(वि**द्युन्माला - दिपमाळेसारखी, लसत्तन्तुरूपा - सूक्ष्मतंतुप्रमाणे (कमळाच्या) व चमकणारी (कुंडलिनीच्या अस्तित्वामुळे), सकलसुखमयी - कोमल व आनंद-देणारी,शुध्दजागृती व ज्ञानरूप,** ब्रह्मव्दार - शिवांकडे जाण्या-येण्याचे व्दार, तदास्ये - ब्रह्मनाडीचे मुख, तदेत - व्दांराकडील जागा, सुधाधारगम्यप्रदेशं - (सुधा-धारा-गम्य-प्रदेशा)- अमृत,शुध्द,शिवशक्ती-मिलन स्थान (प्रकृती-पुरुष मिलनातून निघालेले अमृत), ग्रंथीस्थानं - तीनही नाड्यांच्या गाठीत, **शुध्दबोधस्वभावा - शुध्द बोध देणारी (शुध्द भाव असणारी)**

ती (चित्राणि- जी ब्रह्मनाडीतून वर जाते ती,सुषुन्मा नाडीच्या सर्वात आतली) हि दीपमाळेसारखी सुंदर असून,सूक्ष्म तंतूसारखी आहे (कमळाच्या) जोच योग्यांच्या मनातील शुध्द भाव आहे,ती अतिशय सूक्ष्म असून शुध्दज्ञान प्रदान करणारी आहे,तिची सुरवात ब्रह्मव्दारापासून होते (तिच्या मुखात ब्रह्मव्दार

आहे)ह्याच जागी अमृत वर्षाव होतो,ह्यास गाठ (ब्रह्मगाठ) असेही म्हणतात,तेथे सुषुन्मेची सुरवात सुध्दा आहे (सुशुन्मेचे तोंड तेथे आहे).

# मूलाधार चक्र विवरण

## भूमिका

मूलाधार चक्रावर चार सोनेरी अक्षरे आहेत,त्याच्या परीघावर आठ घन गोल आहेत,खालच्या बाजूस लं हे धाराबीज आहे,ज्यास चार हात आहेत ऐरावतावर बसलेला पिवळ्या रंगाचा आहे,ज्याच्या हातात वज्र आहे,त्या बीजमंत्राच्या बिंदूत पण नादाच्यावर ब्रह्मा आहे,ब्रह्माच्या बाजूला एक लाल कमळ आहे त्यावर चतुर्भुज डाकिनी शक्ती आहे,कमळाच्या परिघावरील त्रिकोणात कामवायू व त्याचे बीज आहे दोन्ही लाल रंगाचे आहे,त्यावर श्यामवर्णी स्वयंभू लिंग आहे,ज्यास कुंडलिनीने साडेतीन वेटोळे घातले आहेत.

अथाधारपद्मं सुषुन्मास्यलग्नं ध्वजाधो गुदोर्ध्दं चतु:शोणपत्रम् ।

अधोवक्त्रमुद्यतसुवर्णाभवर्णैकारादिसान्तैर्युतं वेदवर्णैः ।।४।।

अथाधारपद्मं – आधार (धारामंडल) कमळ,मुलाधार चक्र (कंद व सुशुन्मा ह्याच्या संगमावर) जे गुदाच्या वर आणि लिंगाच्या खाली आहे, सुषुन्मास्यलग्नं - सुशुन्माचे जेथे तोंड जोडले आहे ध्वजाधो गुदोर्ध्दं - लिंगाच्या मुळापासून सुशुन्मेपर्यंत, चतु:शोणपत्रम् - चार गडद-लाल पाकळ्या, र्युतं वेदवर्णै - ह्या चार पाकळ्या चार वेद अक्षरे दर्शवितात (वं,शं,षं,सं), अधोवक्त्रमुद्यतसुवर्णाभवर्णैकारा - ह्या पाकळ्यांचे तोंड खाली असून त्यावरील अक्षरे सुवर्णाप्रमाणे चमकत आहेत.

मुळाधार चक्राच्या पाकळ्यांचे तोंड उलट असून त्यावरील सोनेरी अक्षरे (वं,शं,षं,सं) चार वेद दर्शवितात,ह्यावर ध्यान उजवीकडून डावीकडे,घडयाळ्याच्या काट्याच्या दिशेने करतात,त्यासाठी बीजमंत्र " **लं** "आहे



अमुष्मिन् धरायाश्र्चतुष्कोणचक्रं समुभ्दासि शूलाष्टकैरावृतं ।

लसतपीतवर्णं तडित्कोमलाग्ङे तदक्ङे समाप्ते धराया: स्वबीजम् ।।५।।

अमुष्मिन् धराया श्र्चतुष्कोण चक्रं - त्याचक्रात (मूलाधार), धराया: स्वबीजम् - पृथ्वीचा मूळमंत्र लं जे त्याचे तत्व आहे,जीव सृष्टीचा आधार,शूलाष्ट - अस्त+शुल = आठ घन-गोल अर्थात आठ दिशा तदक्ङे समाप्ते धराया: स्वबीजम् - त्यात पृथ्वीचा बीजमंत्र आहे जो जीव सृष्टीचा आधार आहे, (तदक्ङे समाप्ते)- त्या बीजमंत्राच्या (लं) आंत ,लसतपीतवर्णं तडित्कोमलाग्ङे - तसेच हे बीज, इंद्राचे आहे ह्याचा चमकता पिवळा रंग आहे,तसेच त्याचे शरीर (त्याचा स्वामी) विजेप्रमाणे चमकदार सुंदर आणि कोमल आहे,हा इंद्राचा (लं) बीजमंत्र आहे




कमळाच्या कडेने पृथ्वी आहे,ती चौकोनाने दाखविली आहे व रंग पिवळा असून प्रभा प्रकाश मान आहे,चार बाजू व कोन ह्यावर ह्यावर(आठ)घन-गोल आहेत जे स्त्रीच्या स्तनाच्या टोकासारखे किंवा पर्वताची टोके आहेत (कौलातंत्रातील सातपर्वत निकल,मंद्र,चंद्रशेखर,हिमालय,सुवेल,मलय,सुपर्वत) हे घन-गोल डाकिनी (कुंडलिनी शक्तीच्या विविध तत्वांनुसार विविध भाव व नावे आहेत) शक्तीचे आहेत असे सुध्दा म्हणतात (हि भैरवी आहे-शिवाचा भाव आहे),लं हा बीजमंत्र पृथ्वी चोकोनाच्या आंत आहे ,जो पिवळ्या रंगाचा आहे तो इंद्राचा बीजमंत्र आहे तो ऐरावतावर बसला असून ज्याने हातात वज्र (वीजेचे शस्त्र) घेतले आहे (कारण तो वीज व पाऊस,ढग ह्याचा स्वामी आहे) त्यामुळे पृथ्वी व इंद्र

ह्यांचा बीजमंत्र लं आहे (त्याचे हात गुढघ्यापर्यंत आहेत अर्थात इंद्र अजाणुबाहू आहे) ऐरावत त्या चक्राचे विषेशत्व दर्शवितो.

चतुर्बाहुभूषं गजेंद्राधिरूढं तदङ्के नवीनार्कतुल्यप्रकाश: ।

शिशु: सृष्टिकारी लसद्वेदबाहुर्मुखाम्भोजलक्ष्मीश्चतुर्भोगभेद: ।।६।।

चतुर्बाहुभुषं गजेंद्राधिरूढं - चार हात व हत्तींच्या राजावर असलेला,तदङ्के नवीनार्कतुल्यप्रकाश:- त्याच्या पायाच्या वरच्या बाजूस (धारा बीज) उगवत्या (तरुण) सूर्याप्रमाणे, शिशु: सृष्टिकारी - ब्रह्मा (निर्माण कर्ता) लसद्वेदबाहु- तेजस्वी चार हात (वेदांचे-वेद आहेत),र्मुखाम्भोजलक्ष्मीश्चतुर्भोगभेद: -- ब्रह्मा चारमुखी आहे जणू त्याच्या कमळांसारख्या (चार) मुखातून चार वेद मूर्त झाले आहेत.

पृथ्वीचे बीज लं आहे जे मूलाधार चक्रात आहे व त्यात (अमर असलेला) इंद्र हत्तीवर बसलेला आहे व ब्रह्मा-सृष्टीकर्ता तरुण उगवत्या सूर्याप्रमाणे असून बिंदूत आहे (त्याचे मुख कमळासारखे सुंदर आहे व त्यास चार हात आहेत) पण तो त्याच्या नादाच्या वर आहे.तेथे ब्रह्मा ( खरे तर मायाच मुखाचा भेद उत्पन्न करून तेथे आहे,जी खरेतर पावर्तीच आहे,जी अंभोजलक्ष्मी रुपात तेथे आहे,ब्रह्मीस्वरूपा देवीचे कृष्णाजिनावर (हरणाच्या कातडीवर) बसलेल्या व दंड-कमंडलू व अक्षयमाळा घेतलेल्या व आसनाच्या बाजूने ज्वाळा निघत आहेत अश्या स्वरूपाचे ध्यान करावे)

वसेदत्र देवी च डाकिन्यभिख्या लसव्देदबाहुज्ज्वला रक्तनेत्रा ।

समानोदितानेकसूर्य्यप्रकाशा प्रकाशं बहन्ती सदाशुध्दबुध्दे: ।।७।।


डाकिनी


ऐरावत व गणेश


ब्रह्मा


कुंडलिनी


मूलाधारचक्र

वसेदत्र देवी च डाकिन्यभिख्या लसव्देदबाहुज्ज्वला रक्तनेत्रा - येथे शक्ती डाकिनी आहे जिला चार हात असून सुंदरपणे चमकत (तळपत) आहेत,तिचे डोळे चमकदार लाल आहेत. समानोदितानेकसूर्य्यप्रकाशा

- अनेक सूर्य एकाचवेळी उगवत असतील तशी त्याची प्रभा आहे. प्रकाशं बहन्ती सदाशुध्दबुध्दे - त्याचा प्रकाश नेहमी शुध्द ज्ञानस्वरूप दर्शविते.

मुलाधार चक्राची स्वामिनी डाकिनी शक्ती आहे (जी नेहमी शुध्दबुध्दीची-तत्वज्ञान वाहक आहे) अर्थात त्याची रक्षक आहे,(डाकिनी,राकिनी,काकिन,लाकिनी,साकिनी,हाकिनी ह्या विविध चक्रांच्या स्वामी आहेत,ड,र अशी संस्कृत अक्षरे ते दर्शविण्यासाठी वापरतात) हिचे ध्यान मूलाधार चक्रात करतात हि अदृश्य-शक्तींना (पशु) भितीदायक आहे हिच्या दोन उजव्या हातात (घन-गोल) व मुंडके (कवटी) आहे व दोन्ही डाव्या हातात प्रत्येकी तलवार व दारूचा भरलेला कप आहे,ती तापट असून आपले सुळे दाखविते,ती शत्रूंचा नाश (चिरडते) करते,तिचे शरीर धष्टपुष्ट आहे,ज्यांना अमरत्व हवे आहे ते तिचे ध्यान करतात कारण तिला अमृत प्रिय आहे किंवा तिला दुध,भात,तुप,साखर वगैरे (अनेक इतर गोष्टी) पौष्टिक आवडते,तिच्या कपाळावर कुंकू आहे अर्थात ती सवाशीण आहे,तिच्या लाल डोळ्यात काळे काजळ असून तिची त्वचा अँन्टीलोप (समुद्रातील प्राणी) सारखी आहे.तिने अनेक अलंकार परिधान केले आहेत.

प्रवृत्तीमार्गासाठी मूलाधारचक्र अर्थात पाकळ्या खाली उघडतात तर निवृत्तीमार्गासाठी त्या वर अर्थात परमशिवांकडे जाण्याच्या दिशेने उघडतात.

वज्राख्यावक्त्रदेशे विलसति सततं कर्णिकाममध्यसंस्था

कोणं तत् त्रैपुराख्यं तडिदिव विलसत् कोमलं कामरुपम् ।

कन्दर्पो नाम वायुर्निवसति सततं तस्य मध्ये समन्तात्

जीवेशो बंन्धुजीवप्रकरमभिहसन् कोटिसूर्य्य प्रकाश:।।८।।

वज्राख्यावक्त्रदेशे – वज्रानाडीच्या तोंडाजवळ जी नाजूक व चमकताना सुंदर दिसते, कोणं तत् त्रैपुराख्यं - त्रैपुरा देवीच्या अस्तित्वामुळे त्या त्रिकोणास (कामरूप) तसे नाव आहे जी (देवी) क ह्या अक्षराच्या आंत आहे व क हे अक्षर त्रिकोणात आहे,क हे अक्षर कामबीज आहे (जणु "क" हे त्या देवीचे स्वरूप दाखवितो) क हे कामबीज असून ते क्लीं ह्या मंत्राचे बीज अक्षर आहे.मूलाधारातील त्रिकोण हे सूक्ष्माचे स्थुल स्वरूप आहे.काहिंच्या मते हे इच्छा,ज्ञान,काम ह्यांचे स्थान आहे,त्याच्या तीन बाजू ह्या वाम,जेष्ठा,रौद्री आहेत.त्रिकोणाजवळ व कमळाच्या (मुलाधारा) गोलाभोवती सुंदर-मंद-मादक वाटणारा प्रकाश आहे जे कामरूप आहे,हयासच त्रैपूर असे म्हणतात,तेथे नेहमी असणारा वायू आहे ज्यास कंदर्प

असे म्हणतात,जो गडद लाल रंगाचा आहे तो जीवांचा स्वामी आहे व दहा लाख किंवा (एक कोटी) सूर्यांसारखा त्याचा प्रकाश आहे असे म्हणतात. कोमलं - सुंदर पण नाजूक,मऊ,तेलासारखे-गुळगुळीत कामरुपम् - ज्याने कामाचे अस्तित्व जाणवते,जे मदनाचे स्थान आहे–योनी, जीवेशो - जीवांचा स्वामी,जीवांचे जीवन ह्या कामावर अवलंबून आहे अर्थात कंदर्प वायूवर,(कंदर्प वायू हा अपानाचा भाग आहे,प्राण हृदयात व अपान गुदाजवळ आहे दोन्ही हंऽसा ह्या मंत्राने एकमेकास खेचतात,कंदर्प वायू प्राण शरीराबाहेर जाण्यापासून थांबवितो अर्थात तो जीवांचा स्वामी आहे,कारण प्राण व अपान हे जीवास जीवनचक्र पुढे नेण्यास कारण आहेत) कोटिसूर्य्य प्रकाश:- एक कोटी सूर्यप्रकाश

वज्रानाडीच्या मुखाजवळ व आधार चक्राच्या परिघावर सतत एक मादक तेजस्वी विजेसारखा प्रकाश आहे ज्याचा मूलाधार त्रिकोणाचा (त्रिकोणाचे टोक खाली आहे) भास होतो ,ते कामरूप (पीठ) आहे,ज्यास त्रैपूर असेही म्हणतात,तेथे सर्वत्र नेहमी वायूचा संचार आहे ज्यास कर्दम वायू असे म्हणतात,ज्याचा रंग गडद लाल (देव्हारी-बंधूजिव्हा फुलांपेक्षा गडद अर्थात आपण पाहतो त्या चार पाकळी फुलांपेक्षा गडद ) तेथे जीवांचा स्वामी (काम) आहे ज्याचे तेज कोटीसूर्यासारखे आहे.

तन्मध्ये लिग्ङरुपी द्रुतकनककलाकामेल: पश्र्चिमास्यो

ज्ञानध्यानप्रकाश: प्रथमकिसलयाकाररूप: स्वयंभु: ।

विद्ययुत पुर्णेन्दुबिम्बप्रकरकरचयस्निग्धसन्तानहासी

काशीवासी विलासी विलसती सरिदावर्त्तरूपप्रकार:।।९।।

तन्मध्ये लिग्ङरुपी - त्यात एक स्वयंभू लिंग आहे, द्रुतकनककलाकामेल:- ज्याची प्रभा ओतीव सोन्यासारखी आहे ,पश्र्चिमास्यो - लिंग पश्र्चिमाभीमुख आहे अर्थात उलटे लिंग आहे (अकार्यरत लिंग उलटे आहे) जे कामबीजाने कार्यरत होते. ज्ञानध्यानप्रकाश: - लिंगाबद्दल ज्ञान व ध्यान ह्याने समजते, प्रथमकिसलयाकाररूप: स्वयंभु:- त्याचा रंग व आकार नवीन पालवी सारखा आहे(कळी उमलायच्या आधी असणारा त्याचा रंग व आकार आहे) श्यामल सुंदर निळे-हिरवे असे शिवरूप आहे. सरिदावर्त्तरूपप्रकार: - भोवऱ्याप्रमाणे (लिंगाच्या वरील बाजूचा भाग भोवऱ्यासारखा आत गेलेला आहे) विद्ययुत पुर्णेन्दुबिम्बप्रकरकरचयस्निग्धसन्तानहासी - पूर्णचंद्रासारखा थंड आनंददायीप्रकाश आहे असे त्याचे सौदर्य आहे. काशीवासी विलासी - काशी क्षेत्रात जसे शिव आनंदाने राहतात तसे तेथे आहेत

त्या (त्रिकोणात) स्वयंभू (लिंग) आहे(काळसरसोनेरी रंग) जे ओतीव सोन्यासारखे आहे,ते उपडे आहे,ज्याचा अनुभव ज्ञान व ध्यानाने होतो,(निर्गुण-ज्ञानाने,शब्दब्रह्म सगुण - ध्यानाने) ते नवीन पालवी आलेल्या पानासारखे आहे,शांत व प्रसन्न असा पौर्णिमेचा चंद्र असतो तसे त्याचे तेज आहे,हेच त्याचे सौंदर्य आहे,देव तेथे जसे (मूळस्थानी) काशीस राहतात तसे येथे सुध्दा त्याच आनंदाने राहतात,येथे त्याचे स्वरूप भोवऱ्यासारखे भासते.

तस्योर्ध्वे विसतन्तुसोदरलसत् सूक्ष्मा जगन्मोहिनी

ब्रह्मव्दारमुखं मुखेन मधुरं सत्र्छादयन्ती स्वयम ।

शङ्खावर्त्तनिभा नवीनचचपलामालाविलासास्पदा सुप्ता

सर्पसमा शिवोपरि लसत्सार्ध्दत्रिवृत्ताकृतिः।।१०।।

तस्योर्ध्वे - त्याच्यावर(लिंगावर-वरच्याबाजूस),विसतन्तुसोदरलसत् सूक्ष्मा . सूक्ष्म अशी जी कमळाच्या देठाच्या दोऱ्यासारखी आहे, जगन्मोहिनी - जगाची माया,मोहिनी,धारणा, सत्र्छादयन्ती स्वयम - ब्रह्मव्दार तिने स्वतःच बंद केले आहे,मधुरं- मधुर असे अमृत जे ब्रह्मव्दारातुन स्त्रवते ते पिते,शङ्खावर्त्तनिभा- शंखगोलाप्रमाणे,नवीनचचपलामालाविलासास्पदा - शक्तीशाली नवीन जोम असलेल्या विजेसारखी, सुप्ता - अशी ती सुप्तावस्थेत असलेली, सर्पसमा शिवोपरि लसत्सार्ध्दत्रिवृत्ताकृति - सर्पाप्रमाणे आहे जीने शिवलिंगाला साडेतीन वेटोळे घातले आहेत.

त्यावर (शिव लिंगावर) निद्रिस्त अशी कुंडलिनी कमळाच्या देठाच्या दोऱ्यासारखी ती जगन्माता,मोहिनी ,प्रत्यक्ष मायाच आहे.अगदी सहजपणे शंखाच्या वेटोळ्या प्रमाणे तिने शिवपिंडीस साडेतीन वेटोळे घालून स्वतः ब्रह्मव्दांर बंद केले आहे,त्या सर्पिणीने लाघवीपणाने शिवांना (शिव पिंडीस) साडेतीन वेटोळे घातले आहेत.तिची प्रभा नवीन जोमाने चमकणाऱ्या शक्तीशाली विजेप्रमाणे वाटते.

कुजंन्ती कुलकुण्डली च मधुरं मत्तालिमाला

स्पुटं वाचः कोमलकाव्यबंन्धरचनाभेदातिभेदक्रमैः ।

श्र्वासोच्छवासविभत्र्जनेन जगतां जीवो यया

धार्य्यते सा मूलाम्बुजगव्हरे विलसति प्रोहामदीप्तावलिः।।११।।

तिचे स्वगत (आंतरिक शब्द) हे प्रमाने वेडे झालेल्या मधुमाशांसारखे आहेत - जणू मधुमाशांचा गुंजारव,ती मधुर काव्य व बंध (अक्षरे एकामागून एक निर्माण करून शब्द तयार करते) निर्माण करते,संस्कृत-प्राकृत अशा विविध भाषात ती शब्दनाद करते,तीच सर्व जगाचे पालन श्र्वास-उछ्वासाने (प्रवृत्त-निवृत्त मार्गाने) करते,मुलाधाराच्या खोलगट भागात ती प्रखर दिपमाळेसारखी भासते.कुंडलिनी शक्ती हीच शिवस्वरूप आहे अर्थात ब्रह्म आहे,तिच्या शिवाय श्र्वास-उछ्वास शक्य नाही,कुंडलिनी शक्तीच जीवांच्या वेग-वेगळे अस्तित्वाचे कारण आहे.कुंडलिनी हिच सृष्टीरूप आहे अर्थात तीच निर्माती आहे,तीच जगाची निर्मिती-स्थिती-लय करणारी आहे,ती सृष्टीच्या (प्रकृतीच्या) बाहेर आहे कारण तीच हि सृष्टी ओलांडून जाते,ती ज्ञानरूप आहे अर्थात अन्तःकरण आहे,तिच ऊर्ध्व-गामिनी अर्थात मूलाधारकडून सहस्त्रदलाकडे जाते,तीच इष्ट देवता स्वरूप आहे (इष्ट देवतेचे ध्यान म्हणजे तिचेच ध्यान) तीच नवयौवना असते तेव्हा (उन्नत-पुष्ट स्तन असलेल्या,डोळे एका जागी स्थिर नसणारी) नवतरुणी सारखी रक्तवर्णी भासते तीच श्यामा आहे (अर्थात थंडीत गरम व उन्हाळ्यात थंड) जणू ओतीव सोनेच,चक्र भेदनाच्या आधी ती ब्रह्म भासते जणू अनंत चंद्र उगविले आहेत व तिला चार हात व तीन डोळे आहेत,तीचे आशीर्वाद देण्यासारखे हात हे भयापासून रक्षण करतात (भिऊ नकोस) असे वाटतात,तिने हातात पुस्तक व वीणा घेतली आहे,ती सिंहावर बसली आहे व मूलाधार स्थानी परत जाताना (मूळस्थानी जाताना) विविध रूपे घेते.

तन्मध्ये परमा कलातिकुशला सूक्ष्मातिसूक्ष्मा परा

नित्यानन्दपरम्परातिविगलतपीयूषधाराधरा ।

ब्रह्माण्डादिकटाहमेव सकलं यद् भासया भासते

सेयं श्रीपरमेश्र्वरी विजयते नित्यप्रबोधोदया ।।१२।।

तन्मध्ये – स्वयंभू शिवलिंगात,परमा - अतिशय सूक्ष्म,सर्वत्र,उच्च प्रकारची माया,नादशक्ती अर्थात कला परा - अका,कुंडलिनी,ब्राह्मणी,शब्दरुपात (पराशब्द), कलातिकुशला - हि देवी हे ब्राह्मण(ब्रह्म) जागृत स्वरूप आहे व तिचाच भाग हा मनाचा जागृत भाग चित्त-कला होय(शिवलिंगावर कुंडलिनी व त्यावर चित्त-कला) मन हे ह्या चित्त-कलेचेच कार्यरूप आहे,मनच प्रकृतीशी सलग्न होते म्हणून मन हा ज्ञानेद्रियांचा सहावा भाग आहे,श्रीलक्ष्मीच्या संयोगाने (चित्तकला) ज्योत्तीरूप आहे,सर्व पापांचा नाश करण्यासाठी तिचे ध्यान करावे,ज्योतीच्या आतील ध्यान हे ब्रह्माचे,वरील ध्यान शिवांचे,खालील ध्यान सूर्याचे समजतात,तसेच पूर्ण ज्योत हे परमेश्र्वरचे ध्यान आहे,हि ज्योत नसून अग्नीच होय जो सर्व

पापांचा व दुष्कर्मांचा नाश करणारा आहे.नित्यानन्द- आत्मानंद,निर्गुणब्रह्म,नामरहित परब्रह्म,परम्परा - पायरीने जोडणे (निर्गुण-सगुण-शक्ती-नाद-बिंदू-कुंडलिनी),चित्तकला हे कुंडलिनीचे वेगळे स्वरूपच आहे,तिविगलतपीयूषधाराधरा – अमृतधारा पायरीपायरीने परमेश्वरी अका-चित्तकलेपर्यंत प्रवाहित होते,जेच नित्यानंद-परंपरा आहे,अर्थात निर्गुण ब्रह्माचेच स्वरूप खाली उतरले आहे किंवा नित्यानंद स्वरूपाकडून हे अमृत पराबिंदूपासून, आज्ञा,विशुध्द,अनाहत,मणिपूर,स्वाधीस्थान,मूलाधार असा प्रवास करते. पीयूषधाराधरा - नित्यानंद स्वरूपाकडून आलेला अमृताचा प्रवाह कुंडलिनी प्राप्त करते. ब्रह्माण्डादिकटाहमेव - ब्रह्मांडरुपी अंड्याचा खालचा अर्धा भाग,शिवलिंगावर असलेली कुंडलिनी जणू त्या ब्रह्मांडाच्या खालच्या अर्ध्याभागावर असून तीच्या तेजानेच हे ब्रह्मांड प्रकाशमान आहे व ती अत्युच्च पदाकडे जाण्याचा मार्ग आहे.

त्यात मुख्यत्वे परा,श्रीपरमेश्वरी,जी अंतर्ज्ञान जागृत करणारी अंर्तकला आहे,जी सर्वत्र असणारी कला असून आश्चर्यकारकपणे निर्मिती करण्याची हातोटी ह्या शक्तीत आहे,ती सूक्ष्माहूनही अतिसूक्ष्म (सर्वात सूक्ष्म हीच),अंतर्गत आनंदातून (आत्मानंद)सतत येणारा अमृत प्रवाह प्राप्त करणारी आहे,तिच्या तेजानेच हे ब्रह्मांड प्रकाशित आहे.

धात्वैतन्मूल चक्रान्तविवरलसतकोटिसूर्य्यप्रकाशं वाचामीशो

नरेन्द्र: स भवति सहसा सर्वविद्याविनोदी ।

आरोग्यं तस्य नित्यं निरवधि च महानन्दचित्तान्तरात्मा

वाक्यै: काव्यप्रबन्धै: सकलसुरगुरुन सेवते शुध्दशील:।।१३।।

धात्वैतन्मूल चक्रान्तविवरलसतकोटिसूर्य्यप्रकाशं - कुंडलिनी जिची मूलाधारचक्रात एक कोटी सूर्यप्रकाश (एकाचवेळी) अशी प्रभा आहे तिचे ध्यान करावे, वाक्यै: काव्यप्रबन्धै - खोलवर व संगीतमय शब्द, सेवते - आनंदाने स्तुतीसाठी, गाढप्रेमाने आपल्या आवडीने रचना करणे, सकलसुरगुरुन - सर्व देवांत असलेल्या गुरूंची (ब्रह्मा-विष्णू-महेश्वर व इतर) ती गुरु आहे, सेवते शुध्दशील - शुध्दज्ञान गुरुसुध्दा तिच्याकडूनच सेवन करतात (घेतात)

कुंडलिनीचे मूलाधार चक्रात ध्यान करावे जी कोटी सूर्यप्रकाश आहे ज्याने मनुष्य वकृत्वनिपुण होतो व मनुष्यात राजा होतो,जो काहीही शिकण्यात निपुण होतो (काहीही सहज शिकतो),सर्व रोग नाहीसे

होतात,आत्मतृप्ती त्यास प्राप्त होते,आपल्या शुध्द व संगीतमय रचनेने तो (ब्रह्मा-विष्णू-महेश्वर) देवतांची स्तुती-प्रशंसा करतो.

## मूलाधार चक्र संक्षिप्त स्वरूपात

(पाकळ्या-चार,ज्ञानेद्रींय-नाक,वास,कर्मेद्रिय-गुद,आकार- चौकोन,पृथ्वी आवाज/अक्षर - लँ ) - मूलाधार हे सुरवातीचे चक्र आहे,जे मेरुदंडाच्या खाली आहे,त्यातील चौकोन चार दिशा दाखवितो,जणू हे परीपूर्णत्वाचे लक्षण आहे,पृथ्वी जीवांच्या कल्याणासाठी अनेक पदार्थ मुलद्रव्ये व परिस्थिती धारण करते, जी विविध स्तरांवरील जीवांसाठी आवश्यक आहे,धीरत्व व हव्यास हा त्या पदार्थांचाच भाग-गुण आहे,जीवन पुढे चालू ठेवणे व नेणे हाच ह्याचा हेतू आहे,ह्यात इडा,पिंगळा,सुशुन्मा ह्या तीन नाड्या आहेत,त्यातील उलटा त्रिकोण उर्जेची खालच्या दिशेने होणारी हालचाल व तीन नाड्या दर्शवितो. ह्याचा (चक्राचा) मूळ मंत्र ***लं*** आहे,पिवळा चौकोन पृथ्वी दर्शवितो,कुंडलिनी त्रिकोणात आहे,मूलाधार चक्र प्राण व अपानाचे नियंत्रण करतो,कुंडलिनीचे तोंड खालच्या दिशने आहे म्हणून उर्जा खाली वाहते,जी स्वयंभू शिवलिंगावर निद्रिस्त आहे,तिने शिवलिंगास साडेतीन वेटोळे घातले आहेत,तिने ब्रह्मव्दार अर्थात सुशुन्मा नाडीचे तोंड बंद केले आहे,जेव्हा मूलाधार चक्र साधक जागृत करतो तेव्हा ती आपले डोके उचलून सुशुन्मेतून वर (सहस्त्रात) शिवांशी मिलनाच्या दिशेने प्रवास करते,तिची निद्रा व जागृती ह्यासच विष व अमृत असे समजले जाते,

चक्राच्या गोलावर ब्रह्मा असून त्याची त्वचा गव्हाच्या पीठाच्या (लालसर)वर्णाची आहे,त्याने पाढरे धोतर घातले आहे,तो चतुर्मुख असून चतुर्भुज आहे त्याच्या वरच्या डाव्या हातात पद्म (कमळ) असून ते शुध्दतेचे प्रतिक आहे,दुसऱ्या डाव्या हातात पवित्र ग्रंथ (वेद) आहेत,एका उजव्या हातात अमृताने भरलेले कमंडलू आहे व दुसरा उजवा हात आशिर्वाद (अभयमुद्रेत) आहे.गळ्यात रुदाक्ष माळा आहे,त्याचे वाहन हंस आहे ( मूलाधारात प्रणव हंऽसा,अर्थात श्र्वास-उछवास हि प्रथम पायरी)

चक्रात प्राणी स्वरूपात गणेश आहेत,सर्वांचा जी कार्यारंभाची देवता आहे,तसेच सर्वांपासून संरक्षण होण्यासाठी त्यास नमन करतात,त्याचा रंग फिकट नारिंगी रंगाचा आहे,त्याने पिवळे (पितांबर) धोतर घातले आहे,हिरव्या रंगाचे रेशमी उपरणे खांद्यावर दिसते,त्यास चार हात आहेत व तो सर्व अडचणी दूर करण्यास समर्थ आहे,त्याच्या एका हातात लाडू,एका हातात अंकुश,एका हातात कमळ आहे व एक हात आशीर्वाद (अभय) देण्याच्या मुद्रेत आहे.

डाकिनी - ब्रह्माच्या शक्तीस डाकिनी नाव आहे,तीची गुलाबी रंगाची प्रभा दिसते,तिच्या हातात, कवटी,तलवार.ढाल,फांस आहे (जी उत्पत्ती स्थिती व लय ह्याची प्रतिके आहेत)

।। मूलाधार चक्र विवरण समाप्त ।।

## स्वाधिस्थान चक्र विवरण

### भूमिका

स्वाधीस्थानचक्र हे लालरंगाचे असून त्यावर सहा अक्षरे आहेत,त्याच्या परीघावर पांढऱ्या रंगाचा भाग आहे ज्यास आठ कमळे आहेत,त्याच्या मध्यावर अर्धचंद्र आहे,त्यात वरुणाचा बिजमंत्र वं आहे जो मगरीवर बसला आहे,ज्याच्या हातात फास आहे,त्या मंत्राच्या बिन्दुतील मोकळ्या जागेत श्रीविष्णू गरुडावर बसले आहेत,भयंकर (भितीदायक) दिसणारी त्रिनेत्री राकिणी शक्ती लाल कमळाच्या परीघावर आहे,जी श्यामवर्णी आहे,





बं,भं,मं,यं,रं,लं हि स्वाधीस्थान कमळावरील अक्षरे आहेत, वं हे बीज आहे.

लिंगाच्या मुळाशी सुषुन्मा नाडीत (त्यातील ब्रह्मनाडीत) हे नारिंगी-शेंदरी रंगाचे सहा पाकळ्यांचे चक्र आहे,(स्व-परालिंग-सर्वात वरचे लिंग) ह्या चक्रात अजून एक चक्र आहे,स्वाधिष्ठान चक्र व त्यावर एक चक्र आहे ज्याचे अक्षर लं आहे व बिंदू अनुस्वार एकावर एक आहे (जो विजेसारखा चमकतो) हे इंद्राचे

सिन्दूरपूररुचिरारुणपद्ममन्यत् सौषुम्णमध्यघटितं ध्वजमूलदेशे ।

अङ्गच्छदैः परिवृतं तडिदाभवर्णैर्वाद्यैः सविन्दुलसितैश्च पुरन्दरान्तैः ।।१४।।

सिन्दूरपूररुचिरारुण - सुंदर शेंदरी रंगाचे, सौषुम्णमध्यघटितं - सुषुन्मेत स्थित आहे (स्वाधिष्ठान चक्र सुषुन्मेत आहे.),ध्वजमूलदेशे - लिंगाच्या मुळाशी, अङ्गच्छदैः - त्याच्या सहा पाकळ्यांवर, सविन्दुलसितैश्च पुरन्दरान्तैः - लं हे इंद्राचे (पुरंदरा) बिज अक्षर आहे, ब,भ,म,य,र,ल हि सहा अक्षरे सहा पाकळ्यांवर आहेत,

तस्यान्तरे प्रविलसद्विशदप्रकाशमम्भोजमनडलमथो वरुणस्य तस्य ।

अर्ध्देन्द्रुरूपलसितं शरदिन्दुशुभ्रं वक्ङारबीजममलं मकराधिरूढम् ।।१५।।



म्भोजमनडल(अंभोज मंडल) - वरुणाचा पाण्यासारखा भाग आहे, अर्धेन्द्रुरूपलसितं - अर्धचंद्र स्वरुपात प्रकाशमान, शरदिन्दुशुभ्रं - स्वच्छ पांढरा,

त्या (स्वाधिष्ठान चक्राच्या) मुख्य कमळाच्या बाजूला जो पांढरा भाग आहे तेथे आठ पाकळ्या असलेले (दुसरे) कमळ आहे असे समजले जाते ज्यामध्ये वरुणाचा पाण्यासारखा भाग आहे जो पांढऱ्या रंगाचा आहे,तो अर्धचंद्रासारखा असून त्यात मगरीवर (मगर प्राण्यावर) वं हे बीजअक्षर असून तो (मगर) फासाच्या मदतीने वरुणास (घेऊन जात) ओढत आहे,वं पाढरे शुभ्र (डागरहित) आहे,जणू नवीन (शरदाचा)चंद्रच (डागरहित) त्यावर (बिंदूच्या खोलगट भागात) चतुर्भुज हरी (विष्णू) आहे,जो पूजनीय आहे.







विष्णू राकिनी देवी स्वाधीस्थान

तस्याक्ङदेशकलितो हरिरेव पाबात् नीलप्रकाशरुचिरश्रियमादधान: ।

पीताम्बर: प्रथमयौवनगर्वधारी श्रीवत्सकौस्तुभधरोधृतवेदबाहु: ।।१६।।

तस्याक्ङदेशकलितो - त्यामध्ये वरुण बिजावर (जसा मूलाधारात ब्रह्मा तसेच), नीलप्रकाशरुचिरश्रियमादधान:- निळ्या प्रकाशाची प्रभा दिसते,जी अत्यंत सुंदर आहे, हरिरेव पाबात्- ते विष्णू आहेत,जे तरुण व सुंदर दिसतात. पीताम्बर: प्रथमयौवनगर्वधारी - पितांबर त्यांनी घातले आहे,व आत्ताच तारुण्यात (नवतरुणांना तारुण्याचा गर्व असतो तसे) असल्यासारखे वाटतात. श्रीवत्सकौस्तुभधरो - श्रीवत्स छातीवर असलेले (भृगु चिन्ह)(जे प्रकृतीचे द्योतक आहे) ज्याचे तेज दहाहजार चंद्रासारखे आहे,ज्यांच्या गळ्यात कौस्तुभ मणी आहे (कौस्तुभ मणी कीर्ती व जय प्राप्त करून देतो) कौस्तुभ मण्याचे तेज दहाहजार हिऱ्यांसारखे आहे, धृतवेदबाहु - त्यांचे हात (बाहू) जणू वेदच आहेत.

श्रीहरी जे नवीनच तारुण्यांत (अतिशय स्पुर्ती) असलेले आहेत असे दिसतात,ज्यांचा वर्ण निळा आहे ज्यांनी कौस्तुभ मणी व श्रीवत्स धारण केले आहे,वेद हेच ज्यांचे बाहू आहेत त्यांनी आमचे रक्षण करावे,शंख (सात्विकतेचे प्रतिक.आत्मज्ञान) चक्र(मन)गदा (आदिबुध्दी)पद्म धारण केलेल्या **व** फुलांची माळा (वनमाळा - सर्वप्रकारची रंग-वास असलेली फुले व मध्ये कदंब-जास्वंद फुल) धारण (फुले पंचमहाभूतांचे प्रतिक आहे) केलेल्या श्रीविष्णूचे ध्यान करावे,श्रीविष्णु गरुडावर बसले आहेत (सुशुन्मा व्दार उघडल्यावर हंऽसा (प्रणव) वेगाने सहस्त्राकडे जातो,हयासच आकाशाकडे जाणारा गरुड व हं-सा हे पंख अशी कल्पना आहे)

अत्रैव भाति सततं खलु राकिणी सा नीलाम्बुजोदरसहोदरकान्तिशोभा ।

नानायुघोद्यतकरैर्लसिताग्ङलक्ष्मी: दिव्याम्बराभरणभूषितमत्तचित्ता ।।१७।।

राकिणी - राकिणि देवी जी चक्रात आहे, नीलाम्बुजोदरसहोदरकान्तिशोभा - ती व्दि-कमळावर (दोन कमळे एकावर एक) तिचे सौदर्य आतील निळ्या कमळांच्या अंतर्भागाइतकेच आहे.

येथे राकिनी शक्तीचा प्रभाव आहे,तिचा रंग निळ्या (श्यामवर्ण) कमळांसारखा आहे,तिचे सौदर्य वर उचललेल्या व अनेक शस्त्रे धारण केलेल्या हातांनी अधिकच खुलून दिसते.तिने आकाशरूप वस्त्र व अलंकार घातले आहेत,तिचे मन अमृत प्राशनाने तृप्त झाले आहे.तिचे डोळे लाल आहेत,ति लाल

कमळावर बसली आहे,(तिला दोन डोके आहेत,तीन डोळे आहेत) तिचे दात भीतीदायक वाटतात,नाकातून रक्त वाहात आहे,तिच्या हातात घन-गोल,कमळ,ढोलकें व तनक (लढाईत वापरतात ते चक्र) आहे,ति अनेक वर देण्यास समर्थ आहे,तिला भात आवडतो.

स्वाधिष्ठानख्यमेतत् सरजिजमलं चिन्तयेद् यो

मनुष्यस्तस्याहक्ङारदोषदिकसकलरिपु: क्षीयते तत्क्षणेन ।

योगीश: सोऽपि मोहाभ्दुततिमिरचये भानुतुल्यप्रकाशो

गद्यै: पद्यै: प्रबन्धैर्विरचयति मुधावाक्यसन्दोहलक्ष्मी:।।१८।।

जो हया चक्राचे ध्यान करतो (स्वधिस्थान) तो सर्व शत्रूंपासून (षडरीपु,मोह,माया,अहंकार) मुक्त होतो.तो योग्यांचा राजा अर्थात अत्युच्च योगी होतो,जसा सूर्य गडद अंधकार नाहिसा करतो तसे अज्ञान नाहिसे करण्याचे सामर्थ्य त्याच्यात येते,त्याने उच्चारलेले शब्द जणु अमृतवाणीच.

स्वाधीस्थान चक्र संक्षिप्त

हे चक्र लिंगाजवळ असून हयास सहा पाकळ्या आहेत,हयाचे यंत्र क्रिसेंट चन्द्र (चंद्राचा सोळावा भाग जो मध्ये मोठा व बाजूला निमुळता आहे),हे चक्र चव हया तत्वाचे मुख्य आहे,त्याचे मुलद्रव्य पाणी आहे, (चन्द्र व पाणी हयांचा संबंध यंत्रात दाखविला आहे) हया मंत्राचे बीज वं आहे,त्या मंत्र बीजावर त्याची देवता विष्णु बसली आहे,त्याने पितांबर (सोनेरी-पिवळा) नेसला आहे,त्यांचा (श्रीविष्णु) रंग गडद निळा आहे,त्यांनी रेशमी हिरवे उपरणे घेतले आहे,त्यांनी मुकुट, दंडात व इतर अलंकार घातले आहेत,ते गरुडावर (कुंभकात वायूची प्रचंड शक्ति निर्माण होते,त्यावर श्रीविष्णूंचा ताबा आहे ) बसले आहेत,जेव्हा सुशुन्मा नाडीचे व्दार उघडल्यावर पंचप्राण वेगाने कुंडलिनी मार्गाने वर (सहस्त्राकडे) जातात,श्रीविष्णु तेव्हा जागृत अवस्थेत आहेत असे समजतात.

राकिनी-चाकिनी शक्ति - हया चक्राची हि शक्ति आहे,तिला दोन डोकी,चार हात असून हातात बाण,कवटी,ढोलके,तनक आहे,ति लाल कमळावर बसली आहे,तिने लाल साडी व त्याच रंगाचे अलंकार घातले आहेत,

मगर - हया चक्राचा प्राणी मगर आहे,समुद्राचा राजा व वायूचे वहान,

वरुण - वरुणाचा पाण्यावर (अमृतावर) ताबा आहे,इतर पाणी (रक्त व इतर) हि त्याची स्थुलरूपे आहेत,पाचप्राण पाण्याच्या माध्यमातून आपले कार्य करतात.

।। स्वधिस्थान विवरण समाप्त ।।

## मणीपुरचक्र विवरण

हे नाभीचक्र आहे,जे दहा पाकळ्यांचे आहे,प्रत्येक अक्षरावर बिंदू आहे,त्याच्या परीघावर अग्नीचा त्रिकोण व त्याच्या प्रत्येक बाजूस स्वस्तिक आहे,त्याच्यात चार हातांचा बीजमंत्र रं आहे,जो लाल रंगाचा आहे,त्या वाहिनी बीजाच्या वरच्या बाजूस रुद्र लाल रंगाचा आहे जो बैलावर बसला आहे,तो वृध्द (वृध्द शिव) आहे,त्याच्या अंगावर भस्म आहे,शक्ती लाकिनी आहे जी परीघावर लाल कमळात आहे,ती चतुर्भुज,तीन डोके असलेली व प्रत्येक डोक्यावर तीन डोळे असलेली आहे,

तस्योर्ध्वे नाभिमूले दशदललसिते पूर्णमेघप्रकाशे

नीलाम्भोजप्रकाशैरूपहितजठरे डादिफान्तै: सचन्द्रै: ।

ध्यायेव्दैश्वानरस्यारुपमिहिरसमं मण्डलं तत् त्रिकोणं

तब्दाहये स्वस्तिकाख्यैस्त्रिभिरभिलसितं तत्र वन्हे: स्वबीजम् ।।१९।।



वृध्द शिव     लाकिनीशक्ती







मणीपूरचक्र हे दहा पाकळ्यांचे आहे ( त्यातीवरील अक्षरे डं,ढं,णं,तं,थं,दं,घं,नं,पं,फं) व त्याचे बीजमंत्र अक्षर रं आहे )

तस्योर्ध्वे नाभिमूले - स्वाधीस्थान चक्राच्यावर नाभीमुळावर, दशदललसिते - दहा पाकळ्यांच्या कमळाची प्रभा आहे किंवा त्या दहा पाकळ्यांमुळेच कमळाची प्रभा आहे, पूर्णमेघप्रकाशे - जोरात पाऊस येणाऱ्या ढगांसारखी निलाम्भोजप्रकाशैरूपहितजठरे डादिफान्तै:,- कमळ निळ्यारंगाचे आहे,त्यावर (डं,ढं,णं,तं,थं,दं,घं,नं,पं,फं) अक्षरे आहेत,ते जठरावर (नाभीच्या मुळाशी)आहे सचन्द्रै: - त्यावर चन्द्रबिंदू व नाद बिंदू आहेत, घ्यायेव्दैश्वानरस्यारुणमिहिरसमं (ध्याये-वैश्वानर-अरुण-मिहीर-समं) - तेथे ध्यान करावे तेथील अग्नी उगवत्यासूर्यासारखा ततू त्रिकोणं - तेथील भाग त्रिकोणासारखा आहे.(अग्नीची खूण) तत्र वन्हे: स्वबीजम् - अग्नीचा जो बीजमंत्र आहे (रं) त्याबीजात,
तब्दाह्ये स्वस्तिकाख्यैस्त्रिभिरभिलसितं - त्या त्रिकोणाबाहेर स्वतिकचिन्हे आहेत (त्रिकोणाबाहेर व रं बीजाच्या आत अर्थात अग्नीच्या बीजमंत्राच्या आत)

नाभीकमळाच्या मुळाशी निळ्या रंगाचे (जणू अतिशय पाण्याने भरलेले ढग) दहा पाकळ्यांचे कमळ आहे,त्यावर (डं,ढं,णं,तं,थं,दं,घं,नं,पं,फं) अक्षरे आहेत ज्यावर बिंदू व नाद (अनुस्वार) आहे,तेथील (त्रिकोणरूप) जो अग्नी आहे (वैश्वानर) तो उगवत्या सूर्यासारखा आहे,त्या त्रिकोणाबाहेर तीन स्वस्तिक चिन्हे आहेत,ती रं ह्या अग्नीच्या बीज मंत्राच्या आत आहेत,त्या अग्नीरूप त्रिकोणावर ध्यान करावे, हे कमळ जणु माणिकांचे भंडार आहे म्हणून त्यास मणीपुर असे म्हणतात.

ध्यायेन्मेषाधिरुढं नवतपननिभं वेदबाहूज्वलाग्ङं तत्

क्रोढ़े रुद्रमूर्तिर्निवसति सततं शुध्दसिन्दुरागः ।

भस्मालिप्ताग्ङभूषाभरणसितवपुर्बध्दरुपी त्रिनेत्रो

लोकानामिष्टदाताभयलसितकर: सृष्टिसंहारकारी ।।२०।।

त्या (अग्नीच्या त्रिकोणावर ध्यान करावे त्याच्या वरच्याच बाजूस चतुर्भुज रुद्र निळसर रंगाचे आहेत,त्यांच्या सर्वांगावर भस्म आहे,ते त्रिनेत्र आहेत,त्यांचे हात आशीर्वाद (अभयमुद्रेत) आहेत (बैलावर बसलेल्या रुद्राचे ध्यान करू नये,फक्त रुद्राचे ध्यान करावे)

अत्रास्ते लाकिनी सा सकलशुभकरी वेदबाहूज्वलाग्ङी

श्यामा पीताम्बराद्यैर्विविधविरचनालक्ङ्ता मत्तचित्ता ।

ध्यात्वैतन्नाभिपद्मं प्रभवति नितरां संहृतौ पालनेवा

वाणी तस्याननाब्जे निवसति सततं ज्ञानसन्दोहलक्ष्मी:।।२१।।

येथे लाकिनी जी सर्वप्रदान करणारी आहे,तीला चार हात असून शरीर तेजस्वी आहे,तिचा रंग गडद (निळा) आहे,तिने पिवळ्या रंगाचे कपडे  व अनेक अलंकार घातले आहेत,ति अमृत पिऊन तृप्त झाली आहे,नाभीकमळावर ध्यान केल्याने निर्मिती व लय ह्याची शक्ति प्राप्त होते,सरस्वती आपल्या पूर्ण ज्ञानासहित येथे सदा विद्यमान आहे.येथे लाकिनी शक्तिचे ध्यान करतात जिला चार हात तीन डोळे प्रत्येकी तिन्ही मुखांवर आहेत (तिला तीन मुखे,नऊ डोळे आहेत),ति भितीदायक वाटते,तिचे दात बाहेर आले आहेत,उजव्या हातात तिने विजेचे ( अग्निचेच एक रूप) शस्त्र घेतले आहे,डाव्या हाताने तिने आशिर्वाद (अभय मुद्रा) केली आहे,दहा पाकळ्यांच्या कमळाच्या परीघावर ती आहे,तिला भात,डाळ रक्तात व मांसांत कालवलेली आवडते,तिचे स्तन रक्ताने भरले आहेत,चरबी तिच्या तोंडातून गळते.

## मणीपुर चक्र संक्षिप्त

मणीपुर चक्र,हे सूर्य मंडलाच्या रेषेत आहे,हे अग्नीचे स्थान आहे,हे नाभीच्या जागी आहे,हे चक्र जीवन शक्ति होय,खाली टोक असलेला लाल-त्रिकोण आहे,हा त्रिकोणाच्या गोलावर चक्राच्या पाकळ्या आहेत.

हे दृष्टीचे चक्र आहे,ह्या चक्रावर ध्यान केल्याने सर्व रोग नाहिसे होतात,तसेच परकाया प्रवेश करण्याची सिद्धी प्राप्त होते असे म्हणतात.ह्या चक्राचा अग्नीच्या ज्याळा वर आहेत,

ह्याचा बीजमंत्र रं आहे ह्याचा वायु समान (वायूचे नांव) आहे,जो जीवन वायु होय,हा वायु हात,पाय येथे जास्त आहे,तो अन्नरस सर्व शरीरात नेण्यास कारण आहे.

ह्याची देवता वृध्द रुद्र आहे,जे लय शक्ति दर्शविते,जे निर्माण झाले आहे ते त्या जाऊन मिळते,त्याच्या त्वचेचा रंग कापुरी-निळा,त्याच्या सर्वांगावर भस्म आहे,त्याची दाढी चांदीच्या रंगाची आहे,तो सोनेरी व्याघ्रचार्मावर बसला आहे,त्याची बैठक हि वाघासारखे निडर मन आहे अशी वाटते.जणु इच्छारुपी जंगलात सुध्दा त्यास भय वाटत नाही.रुद्र हे चिता नाहीश्या करणारे व ज्ञान प्रदान करणारे आहेत.

ह्या चक्राची शक्ति हि लाकिनी होय,तिला चार हात,तीन डोकी व प्रत्येक डोक्यावर तीन नेत्र आहेत,तिच्या एका हातात वीज व दुसऱ्या हातात बाण ( दुसऱ्या-स्वाधिष्ठान चक्राच्या कामरूपी धनुष्यातून निघालेला बाण),तिसऱ्या हातात अग्नी,चवथा हात आशिर्वाद (अभय मुद्रा) देण्याच्या मुद्रेत आहे,अग्नीचे वहान रं हा प्राणी आहे.

।। मणीपुरचक्र विवरण समाप्त ।।

## अनाहत चक्र विवरण

### भूमिका

अनाहत चक्रास बारा पाकळ्या आहेत,सर्वांवर बिंदू आहे,षटकोनी आकाराचे धुरकट रंगाचे वायूमंडल त्याच्या परीघावर आहे,त्याच्यावर त्रिकोणाकृती सूर्यमंडल आहे,कोटयावधी विजा चमकाव्या तसा तो आहे,त्याच्या वरती धुरकट रंगाचा वायू काळ्या अंन्टिलोपवर आहे,त्याच्यावरच्या बाजूस त्रिनेत्र ईश आहे,अनाहत चक्राच्या परीघावर दुसरे लाल कमळ आहे ज्यावर सोनेरीझाक असलेली काकिनी शक्ती आहे,त्रिकोणाच्या मध्यात सोनेरी रंगाचे शिव बाण-लिंग स्वरुपात आहेत,त्यांच्या कपाळावर चंद्रकोर व त्या चंद्रकोरीत बिंदू आहे,तेथे इच्छेचे स्थान आहे,जीवात्मा हंsस रुपात त्याखाली आहे,जो निमुळत्या ज्योतीसारखा आहे,मुख्य कमळाच्या परीघावर आठ पाकळ्यांचे कमळ आहे,ज्याच्या पाकळ्या खालच्या बाजूस आहेत,ज्यात कल्पतरू आहे.













शिव    काकिनी शक्ती    कुंडलिनी व रुद्र

तस्योर्ध्वे हृदिपक्ङजं मुललितं बंन्धुककान्त्युज्ज्वलं

काद्यैर्व्दादशवर्णकैरूपहितं सिन्दूररागान्वितै: ।

नन्मानाहतसंज्ञकं मुरतरुं वात्र्छातिरिक्तप्रदं

वायोर्मण्डलमत्र धुमसदृशं षट्कोणशोभान्वितम् ।।२२।।

तस्योर्ध्वे - त्याच्यावर हृदिपक्ङजं - हृदय कमळ , र्व्दादशवर्ण - वीस अक्षरे, नन्मानाहतसंज्ञकं - अनाहत नाद (आवाज येण्यासाठी दोन वस्तूची गरज असते येथे नाद त्याशिवाय ऐकू येतो)

त्यावर अर्थात हृदयात लोभसवाणे कमळ आहे,जे जास्वंदीच्या फुलासारखे आहे,त्यावर कं खं गं घं ङं चं छं जं झं त्रं टं ठं गडद लाल रंगाची आहेत,हृदय कमळात अनाहत नाद आहे जे शब्दब्रह्म आहे.(जो अजपा जप आहे तो हंऽसा होतो) त्यात हृदय कमळात एक कल्पवृक्ष आहे,जो अनाहत म्हणून सुध्दा

ओळखला जातो (कल्पवृक्ष मागणाऱ्याच्या ईच्छेपेक्षा जास्त देणारा आहे,त्यात वायूचा भाग आहे (षटकोनाकृती) ज्याचा रंग धुरकट आहे,(त्यावर सूर्यमंडल आहे जे त्रिकोणी असून ज्याचा प्रकाश कोटीसूर्यासारखा आहे,त्यावर वायू बीज आहे)

तन्मध्ये पवनाक्षरञ्च मधुरं धूमावलीधूसरं ध्यायेत्

पाणिचतुष्टयेन लसितं कृष्णाधिरूढं परम् ।

तन्मध्ये करुणानिधानममलं हंसाभमीशाभिधं

पाणिभ्यामभयंवरञ्च विदधल्लोकत्रयाणामपि ।।२३।।

त्यामधील प्रणव बीजावर (यं) जे मधुर व उत्तम आहे ध्यान करावे,जे धुरासारखे राखाडी असून त्यातील देवास चार हात आहेत,तीन डोळे आहेत,जे काळ्या हरिणावर (अँन्टीलोप) आहे,अर्थात्त तो हवेचे वहान आहे,तसेच त्यामधील दयासागरावर ध्यान करावे जो डागरहित सूर्य (प्रणव) आहे,जो अभयमुद्रेत आहे,जो वर देण्यास समर्थ आहे,तिन्ही जगाची भिती तो निवारतो

अत्रास्ते खलु काकिनी नवतडित् पीता त्रिनेत्रा शुभा

सर्वालक्ङरणान्विता हितकरी सम्यक् जनानां मुद्रा ।

हस्तैः पाशकपालशोभनवरान् संबिभ्रती चाभयं मत्ता

पूर्णसुधारसार्द्रहृदया कक्ङालमालाधरा ।।२४।।

येथे काकिनी शक्ती आहे जिचा रंग पिवळा आहे,ती नवीन विजेसारखी आहे,पवित्र व तृप्त वाटते,तीला तीन डोळे असून सर्वांसाठी अनुकूल आहे,तिच्या अंगावर अनेक प्रकारचे दागिने आहेत,तिच्या हातात फांस,कवटी,तिचा हात अभयमुद्रेत आहे,तिचे हृदय अमृत पिऊन कोमल झाले आहे.तिला दाहीभात आवडतो,ती वारुणी (भाताची दारू) पिते,

एतन्नीरजकर्णिकान्तरसच्छक्तिस्त्रिकोणाभिधा

विद्युत्कोटिसमानकोमलवपुः सास्ते तदन्तर्गतः ।

बाणाख्यःशिवलिग्ङकोऽपि कनकाकाराग्ङगराज्ज्वलो मौलौ

सूक्ष्मविभेदयुभ्ङणिरिवप्रोल्लासलक्ष्म्यालयः ।।२५।।

तेथे एक शक्ती आहे (जी त्रिकोणरूप अर्थात योनी ज्याचे टोक खाली आहे दर्शविली आहे),जी वायू बीजाच्या खाली आहे व कमळाच्या गोलावर (शेवटी) आहे,तिची प्रभा एककोटी विजांसारखी आहे,त्या त्रिकोणात (शक्ती त्रिकोणरुप घेते) एक शिवलिंग आहे (त्रिकोणाच्या मध्ये आहे) ज्यास बाणलिंग असे म्हणतात,हे चमकणाऱ्या सोन्यासारखे आहे,त्यावरील (लिंगावरील) चंद्राच्या बिंदूत एक सूक्ष्म छिद्र आहे (जसे मण्यातील) जो लक्ष्मीकडे (लक्ष्मीच्या-मंदिराकडे) जायचा मार्ग आहे.

ध्यायेद् यो हृदिपक्ङजं सुरतरुं सर्वस्य पीठालयं

देवस्यानिलहीनदीपकलिकाहंसेन संशोभितम् ।

भानोर्मण्ङलमण्डितान्तरलसत्किञ्जल्कशोभाधरं

वाचामीश्र्वर ईश्र्वरोऽपि जगतां रक्षाविनाशे क्षम:।।२६।।

जो ह्या हृदयकमळावर ध्यान करतो,तो वाचा सिध्दी प्राप्त करतो,तसेच ईश्वराप्रमाणे तो रक्षण व नाश करू शकतो,ह्या अनाहत कमळाच्या खाली आठ पाकळयांचे लाल कमळ आहे,ज्या कमळाचे डोके वर आहे,त्यात जणू कल्पवृक्ष आहे,तसेच अनाहत-कमळ हे महादेवाचे स्थान आहे (सर्व-सर्वेश्र्वर),हंऽस मंत्राने त्याचे सौदर्य वाढले आहे,हंऽस (जीवात्मा) हि जणू (निमुळती होत गेलेली))वारा नसलेल्या जागेवरची ज्योत आहे,त्याच्या बाजूने असलेले सूर्यमंडल आनंददायी आहे.ह्या (अनाहत) कमळाचे वैशिष्ठ्य म्हणजे ह्याच्या पाकळ्यांच्या बाजूवर सूर्यप्रकाश आहे (कारण सूर्यमंडळ त्याचक्राच्या वरच आहे,वायू मंडळावर सूर्यमंडल आहे) वाहिनी(अग्नी) सूर्य व चंद्र ह्यांची स्थाने एकावर एक आहेत,अग्नीच्या दहाही कलांचे ध्यान करावे ज्याचा मंत्र मं आहे जो मानसपूजेसाठी वापरतात.

योगीशो भवति प्रियात् प्रियतम: कान्ताकुलस्यानिशं

ज्ञानीशोऽपि कृती जितेन्द्रिययगणो ध्यानावधानक्षम: ।

गद्यै:पद्यपदादिभिश्र्च सततं काव्याम्बुधारावहो

लक्ष्मीरग्ङणदैवतं परपुरे शक्त: प्रवेष्टुं क्षणात ।।२७।।

जो योगी ह्याकमळावर ध्यान करतो तो स्त्रियांना प्रिय होतो (त्याला स्त्रियांना प्रसन्न करण्याची कला प्राप्त होते),त्याची सर्व इंद्रिये ताब्यात येतात,त्याचे मन ब्रह्म चिंतनात अतिशय स्थिर व एकाग्र होते,त्याचे बोलणे निखळ प्रवाहा सारखे वाटते,तो देवांसारखा होतो जो देवी लक्ष्मीस सुध्दा प्रिय

होतो,त्याचे भाग्य उजळते,तो संसारातील उत्तम सुखे भोगून मुक्ती प्राप्त करतो,आकाशगमन, परकायाप्रवेश त्याला शक्य होतो,तो अदृश्य होऊ शकतो.

## अनाहत चक्र संक्षिप्त

अनाहत चक्र हे हृदय चक्र म्हणून सुद्धा ओळखले जाते,हे चक्र शरीरातील समतोल ठेवणारे आहे,ह्या चक्रावर जाणारा योगी संसारिक सुख-दु:खापासून दूर असतो,तसेच संसारातील मोह-माया त्यास स्पर्श करत नाहीत.(हे चक्र त्वचा-स्पर्श ज्ञानेद्रियाचे आहे.मूलद्रव्य हवा होय)

ह्याचक्रास बारा पाकळ्या असून,त्याच्या यंत्रावर दोन त्रिकोण आहेत जे एकमेकांच्या उलटे आहेत,ज्या त्रिकोणाचे टोक वर आहे ते शिवस्वरूप दाखविते,दुसरे शक्ति दर्शविते,जेव्हा दोन्ही शक्ति एकत्र येतात तेव्हा समतोल निर्माण होतो.

ह्याचा बीजमंत्र यं आहे,मुख्य वायु प्राण आहे,देवता ईश्र्वर शिवस्वरूप आहे,त्याचा कर्पूर-निळा रंग आहे, ज्यास दोन हात आहेत,त्यांच्या जटामधून वाहत असलेली गंगा हा शुध्द ज्ञानाचा झरा आहे,अर्थात “अहं ब्रह्मास्मी” ह्या ज्ञानाचा होय.त्याच्या गळयातील सर्प हा संसारिक इच्छांवर मात केल्याचे प्रतिक आहे.त्यांची शक्ति येथे काकिनी आहे,जिच्यामुळे समतोल साधता येतो.(त्रिगुणांचा समतोल)

ह्या अनाहत चक्रातच प्रथम कुंडलिनी शक्ति देवीसारखी प्रकट होते,त्रिकोणाचे टोक वर आहे हे शक्तिचालन वरच्या दिशेने होण्याचे दर्शविते,कुंडलिनी शुभ्र साडीत आहे,शक्ति आत्मकेंद्रित आहे,ति शक्तिरुपाच आहे,ती कुमारी-आईसारखी आहे,ती स्वार्थरहित असून तामसीशक्तीरहित आहे (शुध्दसत्वरूप आहे) ह्या ठिकाणच्या तिच्या देवीरुपात योगी तिच्याशी आदान-प्रदान करू शकतो.येथे तिने लिंगावर वेटोळे घातलेले नसून ती वेगळेपणाने आहे.ती ॐ ह्या नादब्रह्मात आहे.

ह्या चक्रात एक दुसरे लिंग आहे ज्यास बाणलिंग असे म्हणतात हे अ ऊ म त्रिगुणात्मक आहे,मूलाधार चक्रातील लिंगाशी ह्याचे साधर्म्य आहे.

ह्यातील प्राणी हरीण-अँन्टिलोप (प्राण्याचे डोळे मोठे,पाय मजबूत व जलद पाळणारा) हा स्थावर गोष्टींचे हलकेपण (स्थुलाचा हलकेपणा) दर्शवितो.

।। अनाहत चक्र समाप्त ।।

# विशुध्दचक्र विवरण











## भूमिका

विशुध्द चक्र हे जाडसर पाकळ्या असलेले,१६ पाकळ्यांचे धुरकट जांभळ्या रंगाचे चक्र आहे,त्यावर सोळा अक्षरे असून त्यावर बिंदू आहे,पांढरे नभोमंडल त्याच्या परीघावर आहे,ज्यात चंद्रमंडल आहे, हं हे बिजाक्षर पांढऱ्या कपड्यात हत्तीवर आहे ज्यास चार हात आहेत,त्याच्या वरच्या बाजूस सदाशिव सिंहचर्मावर असून बैलाच्या पाठीवर आहेत,त्यांचे अर्धनारीस्वरूप येथे आहे शिव स्वरूप बर्फासारखे पांढरे आहे,अर्धे शक्तीरूप सोनेरी रंगाचे आहे,त्यांना पाच तोंडे दहा हात आहेत,त्यांनी व्याघ्रचर्म अंगावर घातले आहे,त्यांच्या गळ्यात सर्प आहे,त्यांचे कपाळावरील चंद्रकोर कलली आहे तिच्या खालच्या टोकातून अमृत ठिबकत आहे,कमळाच्या परीघावर व चंद्रमंडळात हाडांवर साकिनीशक्ती बसली आहे,ती पांढऱ्या रंगाची आहे,तिने पिवळे कपडे घातले आहेत,तिला पाच डोकी चार हात आहेत,प्रत्येक डोक्यावर तीन नेत्र आहेत,तिने धनुष्य,बाण,फांस,अंकुश घेतला आहे.

विशुध्दाख्यं कण्ठे सरसिजममलं धूमधूम्रावभासं

स्वरैः सर्वैः शोणैर्दलपरिलासितैर्दीपितं दीप्तबुध्देः।

समास्ते पूर्णेन्दुप्रथिततमनभोमण्ङलं वृत्तरूपं

हिमच्छायानागोपरिलासिततनो: शुक्लवर्णाम्बरस्य ।।२८।।

कण्ठे सरसिजममलं धूमधूम्रावभासं – विशुध्दात (अतिशय शुध्द) कंठात धुरकट जांभळा रंग, दलपरिलासितै - (त्या पाकळ्यांवर) स्वरै: सर्वै: शोणैर्दलपरिलासितैर्दीपितं दिप्तबुध्दे:-सर्व व्यंजने ज्याची बुध्दी (दिप्त-संसारिक अशुध्दता नसलेली) प्रज्वलित झाली आहेत त्यांना ती अक्षरे सोळा पाकळ्यांच्या (गडद लालरंगाची) कमळावर सहज दिसतात. समास्ते पूर्णेन्दुप्रथिततमनभोमण्डलं वृत्तरूपं - कमळाच्या परिघावर पांढऱ्या रंगाचा गोलाकार पूर्णचंद्र जो आकाशाचा भाग आहे धुरकट पांढरा, नागो - हत्ती, हिमच्छायानागोपरिलासिततनो: शुक्लवर्णाम्बरस्य - पांढऱ्या (बर्फाच्या) रंगाच्या हत्तीवर आकाशाचे बीज आहे,जे पांढऱ्या रंगाचे आहे.

गळ्यामध्ये (नभोमंडळ) विशुध्दचक्र आहे,जे शुध्द व धुरकट जांभळ्या रंगाचे आहे,सर्व सोळा अक्षरे (व्यंजने),ज्याची बुध्दी शुध्द झाली आहे त्यास परीघावर गडद लालरंगात सहजच दिसतात,त्याच्यावर (नभोमंडळात त्रिकोण आहे, कमळाच्या परिघाच्या आत) आकाशाचा पांढऱ्या रंगाचा गोलाकार जणू पूर्ण चंद्र असा भाग आहे,तो जणू पांढऱ्या हत्तीवर असल्यासारखा दिसतो,जो बर्फासारखा आहे त्यावर आकाशाचे (हं) बीज आहे,

भुजै पाशाभीत्यक्ङशरवरलसितै: शोभिताग्ङस्यतस्य

मनोरक्ङे नित्यं निवसति गिरीजाभिन्नदेहो हिमाभ: ।

त्रिनेत्र: पत्र्जास्यो लसितदशभुजो व्याघ्रचर्म्माम्बराढ्य:

सदापूर्वो देव: शिव इति च समाख्यानसिध्द: प्रसिध्द:।।२९।।

भुजै पाशाभीत्यक्ङशरवरलसितै: शोभिताग्ङस्यतस्य - दोन हातात फास व अंकुश आहे,दोन हात अभय मुद्रेत आहेत,ह्याने त्याची शोभा अजूनच वाढते, मनोरक्ङे नित्यं निवसति गिरीजाभिन्नदेहो हिमाभ: - त्यावर(मनोरक्ङे - त्यावर हं बीजमंत्र ) हिमासारखे शुभ्र देव आहेत जे गिरिजे (पार्वती) पासून अभिन्न (एकरूप) झालेले आहेत, त्रिनेत्र: पत्र्जास्यो लसितदशभुजो व्याघ्रचर्म्माम्बराढय:-तीन नेत्र,पांच मुखे,दहा हात व वाघासारखी त्वचा असलेले त्यांचे कपडे, सदापूर्वो देव: शिव इति च समाख्यानसिध्द: प्रसिध्द:- त्यांचे सदा-शिव हे नांव वरील कारणांनी प्रसिध्द आहे.(गिरिजात्मक - गिरीजेशी एकरूप)

(बीजाच्या) त्याच्या चार हातातील, दोन हातात फास व अंकुश व इतर दोन हात अभयमुद्रेत आहेत,ह्यामुळे त्याच्या सौदर्यात भर पडली आहे.त्याच्यावर (कर्पूरगौर) हिमासारखा पांढरा देव

आहे,त्याला त्रिनेत्र असून त्यास पांच तोंडे आहेत,त्यास दहा हात आहेत,तो देव वाघाच्या कातडी सारख्या कपड्यात आहे,त्याचे शरीर गिरीजेशी (पार्वतीशी) एकरूप झाले आहे,म्हणूनच त्याचे नाव सदा-शिव (शिवशक्ती स्वरूप आहे-अर्धनारी नटेश्र्वर) म्हणून यथार्थ आहे.(डाव्या अर्ध्याबाजूस सुवर्णवर्ण (शक्ती) व उजव्या अर्ध्याबाजूस (कर्पूरगौर)बर्फासारखे पांढरे(शिव),शिवांच्या शरीरावर भस्म आहे(ज्याने ते चांदीचा मुलामा दिल्यासारखे वाटते,त्यांना तीन डोळे प्रत्येकी पांच मुखावर आहेत,त्यांनी व्याघ्राजीन घातले आहे,गळ्यात सर्प अलंकारासारखे वाटतात,त्याच्या (शिव) दहा हातात -
त्रिशूल,ढाल,तलवार,वज्र(विजेचे हत्यार),अग्नी,घंटा,अंकुश,पाश असून एक हात अभयमुद्रेत आहे.त्यांच्या कपाळावरील चंद्रकोरीच्या खाली वळलेल्या भागातून अमृत पडते )




सुधासिन्धो: शुध्दा निवसति कमले साकिनी पीतवस्त्रा

शरं चापं पाशं सृणिमपि दधती हस्तपद्मैश्र्चतुर्भि: ।

सुधांशो: सम्पूर्ण शशपरिरहितं मण्डलं कर्णिकायां

महामोक्षव्दारं श्रियमभिमतशीलस्य शुध्देन्द्रियस्य ।।३०।।

सुधासिन्धो: शुध्दा - अमृत सागरापेक्षा शुध्द श्रियमभिमतशीलस्य - श्री हे योगातील मुक्तीचे व्दार आहे,ज्यास मुक्ती हवी आहे शुध्देन्द्रियस्य - शुध्द,इंद्रिय ज्याने योगमार्गाने शरीर व मन शुध्द केले आहे, शशपरिरहितं - डागरहित चंद्र

अमृतापेक्षा (चंद्रातील) शुध्द अशी साकिनी(शाखिनी)शक्ती (स्वच्छ पांढरी व तेजोमय,तापरहित) (ज्योतीरूप) त्या कमळात आहे,तिच्या हातात धनुष्य,बाण,पाश,अंकुश आहे,डागरहित चंद्र ह्याच्या परीघावर आहे,हा भाग मुक्तीचे व्दार आहे,ज्यांना योगातील संपत्ती प्राप्त करावयाची आहे (मुक्ती - सिध्दी) अर्थात ज्यांनी आपली ज्ञानेंद्रिये शुध्द (मन,वृत्ती) केली आहेत व त्यांच्या ताब्यात आहेत,त्यांनाच हे शक्य आहे,साकिनी शक्तीच्या चार हातात -पाश,अंकुश,पुस्तक आहे तिने एका हाताने ज्ञानमुद्रा (अंगठा व पहिले बोट जोडून) केली आहे,तिचे स्थान हाडे आहे (ती अस्थीदेवता आहे) तिला दुग्धजन्य पदार्थ आवडतात,अमृत पिऊन ती जास्त उतेजीत होते

इहस्थाने चित्तं निरवधि विनाधायात्तसम्पूर्णयोग: ।

कविर्वाग्मी ज्ञानी स भवति नितरां साधक: शान्तचेता:।

त्रिकालानां दर्शी सकलहितकरोरोगशोकप्रमुक्तश्चिरत्र्जीवी

जीवी निरवधि विपदां ध्वंसहंसप्रकाश: ।।३१।।

इहस्थाने - येथे चित्त असल्यास, यात्तप्रणवयोग - पूर्ण कुंभक (येथे ध्यान असलेला योगी,त्रिभुवन क्रोध आल्यास जागी बसूनच हलवू शकतो व त्याची शक्ती ब्रह्मा,विष्णू,महेश्र्वर ना सूर्य (खामानी - सूर्य) गणेश थांबवू शकत नाहित.

येथे चित्त स्थिर केलेला योगी (पूर्णकुंभक साधलेला) आत्मज्ञान प्राप्ती करतो तो बुध्दीमान होतो,त्यास परमशांती लाभते,त्यास सर्व रोगांपासून मुक्ती मिळते,तो त्रिकालदर्शी होतो,तो सर्व संसार-दु:खरहित होऊन,दिर्घायुशी होतो,त्याच्या मार्गातील सर्व अडथळे दूर होतात.हंSस मंत्रासारखा प्रकाशमान होतो.त्यास सर्व शास्त्र आपोओप कळू लागतात.

<u>विशुध्दचक्र विवरण संक्षिप्त</u>

हे चक्र पांढऱ्या गोलात चांदीच्या रंगाची चंद्रकोर (नाद दर्शवितो) असून पांढरा गोल पूर्णचंद्रासारखा चमकत आहे,ह्यास सोळा पाकळ्या आहेत,हे चक्र आवाजाशी (ऐकणे) संबंधित आहे,ह्याचा मंत्र हंSसा आहे,

ह्यात अमृत चित्राणि नाडीत पडते,त्याचे दोन भाग होतात (अमृत व विष) खेचरी मुद्रेने व जालंधर बंधाने अमृत शुध्द करतात,विष शुध्द होऊन अमृत होते जे अमरत्व प्रदान करण्यास समर्थ आहे,ह्या चक्रात खालच्या चक्रातील अशुध्द शुध्द होऊन आकाश तत्वात विलीन होते.

हयाची देवता पांच मुखी रुद्र आहे,तो कापरासारखा (कर्पूरगौरा)आहे,हयात वास,दृष्टी,चव,स्पर्श, आवाज हयाचे एकत्रीकरण आहे व ते शुध्द स्वरुपात आहे,हे स्वरूप - अघोर,ईश्वर,महादेव,सदाशिव,रुद्र स्वरूप आहे,त्याच्या हातात रुद्राक्ष व डमरू आहे जो सारखा वाजत आहे,त्याचा ॐ असा नाद होतो,हयाची शक्ती शाकिनी आहे जी फिकट गुलाबी रंगाची आहे तिने निळी साडी व हिरवे पोलके घातले आहे,ती गुलाबी कमळावर असून तिच्या हातात कवटी (माया संसारापासून दूर असणारे चिन्ह),अंकुश आहे,तिच्याकडे माउत(हत्तीची देखभाल करणारे) आहेत,हि सर्व ज्ञान व सिध्दी प्रदान करणारी आहे, हयाचे वहान ऐरावत आहे,जे धुरकट राखाडी आहे,ज्याचा रंग ढगांसारखा आहे, हे चक्र कानाशी संबधीत आहे,आकार क्रेसेंट चंद्र,बीज हं अक्षर आहे.

।।विशुध्दचक्र विवरण समाप्त।।

## ।। अज्ञाचक्र निरुपण ।।







# भूमिका

हे मुक्तीचे व्दार उघडणारे स्थान आहे,योग्याने सर्व व्दारे बंद करून शास्त्रोक्त मार्गाने चित्ताचा लय करावा,येथे ध्यान (प्रणव) नाहीसे होते,प्रणव हा येथील त्रिकोणाच्या वर आहे जेथे त्यास मन:पटलावर अग्नीज्वाला प्रकाशझोता सारख्या दिसतात,येथे मनाचा लय करून बाहय जगापासून अ:तकरण (चित्त) वेगळे होते ज्याने मनाची शुध्दी पूर्ण होते (चित्तलयापर्यंत मन अशुध्द असते),म्हणून हयास निरालंबपुरी असे सुध्दा म्हणतात.येथे अर्धनारी स्वरूप हे धान्याच्या दाण्याच्या दोन बाजू सारखे (दाण्याचे दोन अर्धे भाग एकत्र जोडलेले असतात तसे स्वरूप) हयास आज्ञेचे चक्र असे सुध्दा म्हणतात कारण जे कल्पनेने किंवा बुध्दीने पाहिले जाते ते मन:पटलावर (चक्रात- जाणीव) उमटते त्यानंतर पुढील प्रत्यक्ष कार्यासाठी आज्ञा येथून दिली जाते अर्थात हे दोन गोष्टी जोडते म्हणून हयास मनाचा डोळा असे सुध्दा म्हणतात.

आज्ञाचक्रावर मानस चक्र आहे असे समजले जाते,हयास सहा पाकळ्या आहेत व वरच्या चक्राकडे हे संदेश पाठवते हयाच्या सर्व पाकळ्या पांढऱ्या असतात पण पाच पाकळ्या ज्ञानेन्द्रियाच्या संदेशानुसार रंग बदलतात सहावी पाकळी झोपेसाठी आहे जी काळी होते.

आज्ञा नामाम्बुजन्तध्दिमकरसदृशं ध्यानधामप्रकाशं

हक्षाभ्यां वै कलाभ्यां परिलसितवपुर्नेत्रपत्रसुशुभ्रम् ।

तन्मध्ये हाकिनी सा शशिसमधरावक्त्रषट्कं दधाना

विद्यां मुद्रां कपालं डमरूजपटवीं बिभ्रती शुध्दचित्ता ।।३२।।

ध्दिमकरसदृशं– हिम - शांत कर - कारण, ध्यानधामप्रकाशं - ध्यानशक्तीने प्रकाशमान, हक्षाभ्यां - ह व क्ष हि बिजावरील अक्षरे - हाकिनी-सां - हाकिनी त्या बीजाची देवता आहे, नेंत्र - नेत्राने,पत्रशुभ्रम - पांढरी पाने (चक्राची) व पांढरी अक्षरे

आज्ञा चक्र हे चंद्रासारखे (स्वच्छ पांढरे व शांत आहे)आहे,त्यास दोन पाकळ्या असून त्या वरील ह क्ष अक्षरे सुध्दा पांढऱ्याच रंगाची आहेत,ध्यानाने ते प्रकाशमान होते (ध्यानानील ती मोठी झेप आहे),त्यात हाकिनी (शक्ती) आहे, जिला सहा तोंडे आहेत (व प्रत्येक डोक्यावर तीन नेत्र),सहा हात आहेत,तिच्या हातात पुस्तक आहे(ज्ञानमुद्रा केली आहे),दुसरे हात अभयमुद्रेत आहेत,एका हातात कवटी,एका हातात

डमरू, व माळ आहे,तिचे मन (चित्तशुध्द) शुध्द आहे,तिला शिजवलेले अन्न आवडते,ती अमृत प्यायल्यानंतर उतेज्जीत होते,हे चक्र मनाचे स्थान आहे,जे भृकुटी मध्यात आहे

एतत्पद्म्यान्तराले निवसति च मन: सूक्ष्मरूपं प्रसिध्दं

योनौ तत्कर्णिकायामितरशिवपदं लिग्ङचिन्हप्रकाशम् ।

विद्युन्मालाविलासं परमकुलपदं ब्रह्मसूत्रंप्रबोधं

वेदानामादिबीजं स्थिरतरहृदयश्चिन्तयेत्तत्क्रमेण ।।३३।।

एतत्पद्म्यान्तराले - त्या पद्मात, सूक्ष्मरूपं - मन जे सूक्ष्मरूप आहे, प्रसिध्दं - जे असल्याचे प्रसिध्द आहे कारण ते अनादिपुरुषापासून आहे, वेदांच्या आदिबिजा आधीपासून आहे, योनौ तत्कर्णिकायामितरशिवपदं - योनीच्या आत शिवलिंग असल्याचे जाणवते जे कमळाच्या परीघाच्या (त्रिकोणात) आत आहे, विद्युन्मालाविलासं - विद्युत-वीज सारखी चमकल्या सारखे,परमकुलपदं - उत्कृष्ट कुलाची जागा (अत्युच्च शक्ती -त्रिकोणाकृती आहे) ब्रह्मसूत्रं - चित्राणि नाडी, प्रबोधं -प्रणवाने ती प्रकाशमान होते.

ह्यात (कमळात) सूक्ष्मपणे मन स्थित आहे,त्या कमळातील योनीत शिवलिंग आहे ह्यास इत्रलिंग असे म्हणतात,जे सतत येणाऱ्या विजेच्या झोतामुळे समजते,वेदाचे आदिबीज (ॐ) जे सर्वोच्च शक्तीचे स्थान आहे व ज्याच्या प्रभेने ब्रह्मसूत्र (वाज्राणी नाडी) दिसते - प्रकाशित होते,ते येथे आहे,साधकाने येथे स्थिर मनाने ध्यान करावे,हे चक्र मनाचे (मन जे सूक्ष्म आहे) स्थान आहे,जे सर्व ज्ञानेंन्द्रियांच्या पलीकडे व वेदांच्या आदिबीजाच्या वर आहे,परिघावरील त्रिकोण हि योनी आहे अर्थात हि कुलशक्ती होय,ज्यातील लिंग हे शुभ्र पाढरे हिऱ्यासारखे (पारदर्शक) आहे,ह्यास इत्रलिंग सुध्दा म्हणतात,ज्यास तीन डोळे आहेत,त्या त्रिकोणात आत्मा प्रणव रुपात आहे,त्यावरील ज्योतिरूप हा नाद होय,व बिंदू हा मकार (म-मकार-अउम मधील “म”)आहे,ह्यासर्वांच्या वर मन आहे.

ध्यानात्मा साधकेंद्रो भवति परपुरे शीघ्रगामी मुनीन्द्र:

सर्वज्ञ: सर्वदर्शी सकलहितकर: सर्वशाखार्थवेत्ता ।

अव्दैताचारवादी विलसति परमापूर्वसिध्दिप्रसिध्दो

दीर्घायु:सोsपि कर्ता त्रिभुवनभुवने संहृतौ पालने च ।।३४।।

ह्या चक्रावर ध्यान करणारा जलद कोठेही जाऊ शकतो तो मुनीमध्ये श्रेष्ठ होतो,सर्व शास्त्रांचे ज्ञान असणारा,अव्दैत ज्ञान असणारा अर्थात आपण व हे सर्व जग ब्रह्मच आहे हे जाणणारा होतो,त्यास परकाया प्रवेश शक्य होतो कारण त्याचा आत्मा म्हणजे त्या कमळावरील ध्यान होय,तो सर्वांचे कल्याण करणारा होतो,तसेच ह्या चक्रावर ध्यान करणारा शुध्दबुध्दी असणारा असतो,कारण येथे सतत शुध्दाचाच वास आहे,जो ज्योतिरूप प्रणव आहे,(प्रणवातील अ व ऊ मिळून ओ होतो ज्यास अर्धचंद्र (मकार-अर्धबिंदू अर्थात तुर्या) जोडून ॐ आहे हीच शुध्द बुध्दी आहे)




आज्ञाचक्रातील रचना

तदन्तश्चक्रेऽस्मिन्निवसति सततं शुध्दबुध्दयन्तरात्मा

प्रदीपाभज्योति: प्रणवविरचनारूपवर्णप्रकाश: ।

तदूर्ध्वेचन्द्रार्ध्दस्तदुपरिविलसध्दिन्दुरुपी मकारस्तदूर्ध्दे

नादोऽसौ बलधवलसुधारसन्तानहासी ।।३५।।

ह्या चक्रावर अजून एक शब्द जोडी आहे ज्याने प्रणव होतो तो अंतरात्मा (प्रणव)शुध्दमन (बुध्दी) होय.त्याचा प्रकाश ज्योतीरूप आहे,त्यावर चंद्रकोर व त्या प्रणवावर अजून एक मकार जो बिंदूरूप आहे, जो अतिशय शुभ्र आहे जणू हजारो चंद्रच (अमृतवर्षा-आनंदडोह) त्यावर अवांतर (शेवटचा-दुसरा) महानाद आहे, आज्ञाचक्र - कमळात हाकिनी- त्यावरील त्रिकोणात इत्रलिंग (येथे अकार कारण त्रयोदशस्वरसदृशवर्णप्रकाश: शुध्दबुध्दी अंतरात्मा),त्यावरील त्रिकोणात प्रणव (अर्धचंद्ररुपी मकार व त्रयोदशवर्ण मिळून प्रणव ,त्यावर अवांतर नाद (शुभ्राहून शुभ्र) अर्थात (पराबिंदू) बिंदूरूप मकार ज्याचा मुलापासून ब्रह्मरंध्रापर्यंत प्रकाश त्यावर सूक्ष्म मन त्यावर हंऽस: शक्तीसहित शिव)

प्रणवं निरूप्य इदानीं तद्द्योगं निरुपयति इह स्थान इति ।

दां पश्यति कणान् ततस्तन्मध्यान्त: प्रविलसितरूपानपि सदा ।।३६।।

ह्या स्थानी शास्त्रोक्तरित्या (हंऽसा) योग्याने सर्व व्दारे बंद करून मनाचा (चित्तलय) प्रयन्ताने लय करावा ज्याने त्यास निरावलंब (आधाररहित स्थिति) प्राप्त होईल,मनाचा (चित्त) पूर्ण लय ह्याच स्थितीत होतो ज्याने संसाराशी (बाह्य-जगाशी) संबंध संपतो,अश्या स्तितीत मन पूर्ण शुध्द अवस्थेत असते,(चित्तलय झाल्यावर योग्याला बंधने नसतात त्यामुळे तो गगनात वेगाने विहार करू शकतो) चित्ताचा पूर्ण लय होतो,तेव्हा कमळाच्या त्रिकोणावर जेथे प्रणव स्थान आहे,तेथे योग्यास सतत (न थांबणारा) विजेचा झोत (-अग्नी ज्वाळा) दिसतो,तेथे अतिशय अक्षय-आनंदमय स्थिति आहे.

जलद्दीपाकारं तदनु च नवीनार्कबहुलप्रकाशं

ज्योतिर्वा गगनधरणीमध्यमिलितम् ।

इहस्थाने साक्षाभ्दवति भगवान पूर्णविभवोऽव्यय:

साक्षी वन्हे: शशिमिहीरयोर्मण्डल इव ।।३७।।

त्यानंतर योग्यास दैदीप्यमन ज्योत दिसते,(हि ज्योत धरणी- मुलाधारापासून गगनापर्यंत - वाज्राणी नाडी वरील मोकळ्या जागेपर्यंत-सहस्त्रात आहे) ज्याची सकाळच्या सूर्यासारखी प्रभा आहे,जी पृथ्वी व आकाशात आहे,हयाठिकाणी परमेश्र्वराचे पूर्णरूप पहावयास मिळते,येथे स्थित योगी काळाच्या पलीकडे जातो,तो सर्वाचा साक्षीरूप होतो,जेथे हे शक्य होते तो भाग सूर्य,चन्द्र,अग्नीचा आहे.जो मणीपीठावरील त्रिकोण आहे,हा त्रिकोण अ-का-था हया त्रिकोणाच्या आत आहे.

शब्दब्रहम हि एक स्पंदन अवस्था आहे.हया शब्दब्रहमातील कमाकाल हया शब्दब्रहमात उत्पत्ती स्थिति व लय हया शक्ति आहेत,जे उलट्या त्रिकोणाने दर्शवितात,त्रिकोणाच्या तीन बाजू इच्छा,कार्य,ज्ञान दर्शवितात,त्रिकोणाच्या तीनही टोकांवर बिंदु आहे अग्नी - वाहिनी बिंदु,चन्द्र - चन्द्रबिंदु,सूर्य- सूर्यबिंदु (हया बिंदुना वामा,जेष्ठा,रुद्री असे सुध्दा म्हणतात),शक्ति हया तीनही बिंदुतून कार्य करतात (रज,सत्व,तम)

सच्चीदानंद स्वरूप → शक्ति → नाद निर्मिती → नादाचा शब्द होणे → बिंदु → बिंदूचे तीन भाग (शिवशक्ति मायेत(परमकुंडली),बिंदुतील मोकळी जागा-त्रिगुण,बिंदुचा स्थुलभाग (शून्य,ब्रहमपद)

बिंदु → चित्ताची जागृत स्थिति,चिद्दपता (निर्मिती जग)(निर्माण शक्ति अव्ययरूप,त्रिगुण,अव्यक्त,शान्त)

बिंदु → तीन भाग → कार्य-लयचित्त,नाद - ज्ञान (शिवशक्ति निर्मितीअवस्था,),वान - स्थुल प्रकृति

बिंदु → पांढरा (शिव),लाल(शक्ति),दोन्हीरंग एकत्र (शिवशक्ति)

त्रिगुण,त्रिबिंदू (कमाकाल) अ-खा-ता त्रिकोण - रुद्रबिंदू (शिव)-ज्ञान,सत्वबिंदु - जेष्ठा(क्रिया),

रजोबिंदू-वाम(ब्रहमा)- इच्छा ,(शिवशक्ति मिलन - नाद तयार होणे - महाबिंदू निर्मिती - कमाकाल)

क्रियाशक्ति मूर्तरूप देते.

अ - का - था त्रिकोण (अमाकाल) स्पंदनरूपब्रह्म




कमाकाल हे शब्दब्रह्म असून तीन शक्तींनी बनलेले आहे (उत्पत्ती,स्थिती,लय) हे शक्ती स्थान आहे ज्यास (अबल(शक्ती) + अलय (ठिकाण)) उलटया त्रिकोणाने दाखवितात,त्याच्या बाजू इच्छा,कार्य,ज्ञान आहेत,ह्यात्रिकोणास वाहिनीबिंदू,चंद्रबिंदू,सूर्यबिंदू ह्या वाम,जेष्ठा,रौद्री (उत्पत्ती,स्थिती,लय) आहेत,ह्या त्रिकोणाच्या कोणावरील तीन बिंदुतून कार्य करतात (ह्यांचा ब्रह्मा,विष्णू,महेश्र्वर ह्यां देवांशी संबंध आहे(त्रिकोणाच्या तिन्ही बाजूंचे अक्षर प्रत्येकी अ,क,थ आहे व त्यास त्यापासून पुढे सोळा संस्कृत व्यंजने आहेत, म्हणून ह्यास अ-क-थ त्रिकोण म्हणतात.

इहस्थाने विष्णौरतुलपरमामोदमधुरे

समारोप्य प्राणं प्रमुदितमना: प्राणनिधने ।

परं नित्यं देवं पुरुषमजमार्ष त्रिजगतां पुराणं

योगीन्द्र: प्रविलसति वेदान्तविदितम् ।।३८।।

हे विष्णूंचे स्थान आहे,जे सर्वात उत्तम आहे,योगीजन शरीरत्याग करताना ह्याच ठिकाणी आपले प्राण ठेवतात,कारण हे परमपुरुषाचे स्थान आहे,जो आदिपुरुष असून जे वेद व शास्त्रांना ज्ञात आहे,

<u>आज्ञाचक्र संक्षिप्त रुपात</u>

आज्ञा चक्र हे तृतीयनेत्र होय अर्थात जागृत मन,जे भविष्यकाळ पाहू शकते,ह्याचे बीज ॐ आहे,ह्या चक्रात असलेल्या योगी संसारिक सर्व जाणिवांपासून दूर जातो,येथे सरस्वती सूर्य व चंद्र ह्यांचा

समतोल साधते,इडा व पिंगळा नाड्या सुशुन्मेतून निघून,ह्याठिकाणी सरस्वतीस मिळतात,ह्या नाडीसंगम त्रिगुणांचा असून व्दैत संपून सरस्वतीच्या मिलनाने अव्दैत होऊन शुध्दत येते,ज्याने योगी त्रिकालदर्शी होतो.आता पर्यंत असलेले काळाचे बंधन येथे संपते.येथे अर्धनारी नटेश्र्वर स्वरूप लिंगात आहे व लिंग पांढरे असून,उजव्या बाजूस शिव व डाव्या बाजूस शक्ती आहे,शिव कर्पूरगौर आहेत,त्यांच्या हातात त्रिशूल आहे,जे जाणीवेच्या स्वप्न,जागृती,सुषुप्ती अवस्था दाखवितो.शक्ती गुलाबी रंगाची (शुध्दतेचे प्रतिक आहे) आहे,तिने लाल साडी घातली असून अंगावर सोन्याचे दागिने आहेत,तिच्या हातात गुलाबी कमळ आहे,आज्ञाचक्रात शिव सर्व ज्ञान प्रदान करणारे आहेत. येथे शक्ती हाकिनी आहे,तिला चार हात सहा डोकी आहेत,तीच रंग पंधरा-गुलाबी आहे,तिने सुवर्णालंकार घातले असून हिरे चमकत आहेत,तिने लाल साडी घातले असून ती गुलाबी कमळात आहे,तिने डावा पाय उचलला आहे,तिने हातात डमरू (जे साधकाचा मार्ग सुकर करते),कवटी (संसारिक गोष्टीपासून दूर),माळा असून एक हात अभयमुद्रेत आहे.

।। आज्ञाचक्रविवरण समाप्त ।।

गुरूचा महिमा (महत्व)

लयस्थानं वायोस्तदुपरि च महानादरूपं शिवार्ध्दे

सिरकारं शान्त वरदमयं शुध्दबुध्दीप्रकाशम् ।

यदा योगी पश्येद गुरुचरणयुगाम्भोजसेवासुशीलस्तदा

वाचां सिध्दि: करकमलतले तस्य भूयात् सदैव ।।३९।।

जो योगी गुरूचरणाची कृपा प्राप्त करतो,तो मनाच्या अतिशय एकाग्रतेने महानाद ऐकू शकतो,(महानाद - “ह” ह्या अक्षराचा वरील भाग नसेल तर ते नागरांसारखे दिसेल हाच शिवांचा अर्धा भाग आहे येथे भीती नष्ट होऊन शुध्द ज्ञान प्रकट होते) ह्या आज्ञा चक्रात वायूचा संबंध नाहीसा होतो (ह्या चक्रात वायूचा प्रभाव संपतो),असा योगी वाचासिध्दी प्राप्त करतो.

शक्ती हि चित्तात आहे वरच्या मकारावर योगी ध्यान करतो तेव्हा शक्ती हि बिंदूरूपाकडून नादरुपाकडे अर्थात प्रकृती स्वभाकडून पुरुष-शिव स्वभावाकडे वळते,अशी जेव्हा ती ऊर्ध्व होते तेव्हा महानाद ऐकू येतो,हेच अर्धे शिवरूप (ह अक्षराचा अर्धा भाग काढल्यावरची स्थिती आहे),प्रकृतीस्वभावाकडून पुरुषस्वभावाकडे जाणे हेच मुक्तीचे व्दारं उघडणे आहे,कारण येथे चित्ताचा

प्रकृतीचा भाग नाहीसा होतो, हंऽसा ह्या मंत्राने परमशून्य अवस्था (निरालंब) जरी असली तरी त्यापुढे हंऽसा: ह्या मंत्राच्या सा: मधील दोन टिंबे (बिंदू) हि शिल्लक आहेत,जी सहस्त्रदल कमळातील (परमशून्यदेश) आहेत,त्या बिंदूमधील जागेत परमशिव स्वरूप आहे,जे अविनाशी स्वरूप आहे,ललाट चक्रात अर्धनारी नटेश्र्वर आहेत जेथे पूर्णचंद्र प्रकाश आहे,जे अतिशय आनंददायी (अमृतडोह) रूप आहे. (ललाटचक्रातून योग्याने पुढे जायचे आहे कारण अजून शिवस्वरूप हे मायेबरोबर आहे,पूर्ण माया ओलांडण्यासाठी हंऽसा: मधील विसर्ग शिल्लक आहे)

## <u>सहस्त्रदल चक्र निरुपण</u>

### <u>भूमिका</u>

सुशुन्मा नाडीच्या टोकाच्यावरती एक कमळ आहे जे हजार पाकळ्यांचे आहे,ते पांढरे असून त्याचे तोंड खाली आहे,त्या पाकळ्यांची किनार लालसर असून त्यावर अ ते ल (क्ष सोडून) संस्कृत अक्षरे अशी ५० अक्षरे विसवेळा आहेत,त्याच्या परीघावर हंऽसा: असून त्यावर गुरु अर्थात प्रत्यक्ष परमशिव आहेत,त्यावर सूर्य-चंद्र मंडल व त्यावर महा-वायू आहे,त्यावर ब्रह्मरंध्र आहे,त्यावर महाशंखिणी,चंद्रमंडल त्रिकोणासारखे चमकत आहे,ज्यात चंद्राची सोळावी कला अमाकाल आहे,जी कमळाच्या देठाच्या टोकाचे शंभर भाग केले तर त्याच्या एका भागा एवढी आहे,ती लाल रंगाची आहे,तिचे तोंड खाली आहे,तिच्या वर दुसरी कला ज्यास निर्वाण कला म्हणतात ती आहे जी केसाच्या टोकाचे हजार भाग केले तर एका भागासारखी आहे,ती लाल असून तिचेही तोंड खाली आहे,त्या (निर्वाण) कले खाली अग्नी आहे ज्यास निबोधिका असे म्हणतात,ज्यास अव्यक्त नाद असे सुध्दा म्हणतात,ह्या निर्वाण कलेत पराबिंदू आहे,तो शिवशक्तीस्वरूप आहे,शक्ती निर्वाणशक्ती होय,ती तेजोरूप आहे व हंऽसा: स्वरुपात आहे,ती केसाच्या टोकाच्या कोट्यांश भागाइतकी सूक्ष्म आहे,हंऽसा: हा जीवात्मा आहे,पराबिंदूतील मोकळ्या जागेत शून्य आहे,जे ब्रह्मपद आहे.

काहीच्या मते सहस्त्रातील परिघावर अ-का-थ (कामाकाल) त्रिकोण (अक्षरे त्रिकोणासारखी आहेत – ह,ल,क्ष अक्षरे तीन कोनात आहेत) उलटा आहे (टोक खाली) खालच्या टोकाच्या बिंदूवर हकार (पुरुष) व इतर दोन टोकावर विसर्ग (स:) जो प्रकृती दर्शवितो(मातृकामयी आहे),अश्या रीतीने हंऽसा: असे प्रकृती-पुरुष आहेत,(काहीजण ह्यास शिवशक्तीचे च-का काररूप असे म्हणतात कारण शिवशक्तीत वेष्टित आहेत जे बिंदूरूप आहे) त्यामध्ये अमाकाल व त्यावर निर्वाणशक्ती आहे,निर्वाणशक्तीतील मोकळी जागा हि परमब्राह्मण-ब्रह्म आहे,चंद्रमंडलात अ-का-थ त्रिकोण (कमाकाल) व अमाकाल विजेप्रमाणे चमकत आहे,हंऽसा: वर गुरुंचे कमळ आहे.

इंदूचक्र किवा सोम चक्र - हे टाळूमुळात आहे जेथे (अमावस्येचा अर्धचंद्राने व त्यावर बिंदूने दर्शवितात) असलेल्या पांढऱ्या बिंदुतून (शुक्र) अमृत येते योगीजन त्याखाली असलेला लालबिंदू (मासिकपाळीचे रक्त) ह्यांचे मिलन करतात,हे चक्र (१६ पाकळ्यांचे चक्र) चित्तवृत्तींचे आहे.

निर्वाणचक्र - सहस्त्रात हे पांढऱ्या १०० पाकळ्यांचे आहे,येथे सुशुन्मा संपते,ध्यान,धारणा व सविकल्प समाधी ह्यासाठी हे प्रसिध्द आहे.

विसर्ग - पहिल्या (हंसा:) विसर्गात अमाकला,दुसऱ्या विसर्गात निर्वाणकला व निर्वाणशक्ती येथून कुंडलिनीस शंखिणी असे म्हणतात,ती पराबिंदुस पहिला वेढा,परानादास दुसरा वेढा,शक्तीस तिसरा वेढा घालते व अर्धावेढा सकलशिव ह्यात शिरतो,त्यानंतर परमशिवात लिन होते जी निर्विकल्प समाधी आहे.विसर्ग संप्रज्ञात (सबीज) समाधीतून असंप्रज्ञात (निर्विकल्प) समाधीकडे नेणारा बदल दर्शवितो.

तद्रूर्ध्वे शखिङन्या निवसति शिखरे शून्यदेशे प्रकाशं

विसर्गाध: पद्मं दशशतदलं पूर्णचन्द्रातिशुभ्रम् ।

अधोवस्त्रं कान्तं तरुणरविकलाकान्तिकिज्यत्कयुज्यं

ललाटाद्यैवर्णै: प्रविलसितवपु: केवलानन्दरुपम् ।।४०।।

त्याच्या ऊर्ध्व भागात एक मोकळी जागा (परमव्योम-परमआकाश) आहे जी संखिनी नाडीच्या वर आहे (जेथे सुशुन्मा संपते-जेथे नाड्या नाहीत) व विसर्गाच्या खाली (विसर्ग ब्रह्मरंध्राच्या वरील भागात आहे) एक हजार पाकळ्यांचे एक कमळ (सहस्त्रदल,परमव्योम,वैकुंठ) आहे,जे मोहक आहे,ज्या कमळाची प्रभा पूर्णचंद्रापेक्षा जास्त आहे,ज्याचे मुख खाली आहे,(निर्वाण होताना मुख वर होते) त्या पाकळ्यांना उगवत्या सूर्यप्रकाशासारखी झाक आहे,कमळाची शोभा (व प्रभा) (ललाटाद्यैवर्णै: प्रविलसितवपु केवलानन्दरुपम् ) अ ह्या आद्याक्षराने आहे,जेथे सुखच (कैवल्य) सुख आहे.(सहस्त्रदल कमळात संस्कृत मधील अ पासून (क्ष सोडून) सर्व अक्षरे ५० आहेत ती वीस वेळा आहेत अर्थात ५०x २० = १००० हि अक्षरे उजवीकडून डावीकडे आहेत.घडाळ्याच्या काट्याच्या उलट दिशेने क्रम आहे)

आकाशाचाशब्दासहित व्योमात लय करावा (प्रथम बिंदू (शक्तीचे ज्योतीच्याजवळील प्रकृती रूप) नंतर नाद (बिंदू व नाद मिळून क्रियाशक्ती -कमाकाल),नंतर महानाद(शक्तीचेपुरुषाकडील(शिव) वळलेले स्वरूप),(शक्ती बिंदुरूप किंवा नादरूप होते,शक्ती प्रकृतीकडे बिंदूरूप तर शिवांकडे नादरूप असते) नंतर कलाशक्ती,अहंकाराचा महतात लय करावा(त्रिगुण व अहंकार मिळून महतत्व होते,अव्यक्त स्वरूप व्यक्त होण्यानंतर अव्यक्ताचे विकृतरूप (प्रतिबिंब) हे महतत्व आहे.ज्यात त्रिगुणांची साम्यांवस्था आहे) आज्ञाचक्रात हाकिनी (मनाचे स्थान),इत्रलिंग,प्रणव, मानस(निर्णय-करणारी- होकार,नकार),अहंकार,बुध्दी व प्रकृती असा वर जाणारा क्रम आहे)


परम शिव
शंखिणीचे अर्धे वेटोळे
सकळ शिव
शंखिणीचे 3रे वेटोळे
शक्ती
शंखिणीचे 2रे वेटोळे
परम नाद
परमबिंदू
निर्वाण शक्ती
निरोधिका अग्नी
निर्वाण कला
अमाकाळा
शंखिणीचे पहिले वेटोळे
2रा विसर्ग
सहस्त्रादळ चक्र
1ला विसर्ग
चंद्राचा गोळ
सहस्त्रदल चक्र रचना

योग्याने तत्वाचा लय करत वर वर जावे (१) पृथ्वीमंडल - गंधतत्व,पाय,वास (२) जलमंडल - रसतत्व,हात,चव (३) वाहिनीमंडल-रूपतत्व,गुद,दृष्टी (४)वायूमंडल-लिंग,त्वचा,स्पर्शतत्व(५)नभोमंडळ - वाचा,शब्दतत्व,कान व महाभूते मिळून वीस तत्वे(६)आज्ञा चक्रात - (आकाश) व्योममंडल- येथे ७) करण (७ प्रकारचे करण) - आज्ञाचक्राच्यावर दुसराबिंदू आहे जो शिवस्वरूप आहे,त्यावर शक्ती बोधिनी (अर्धमात्रा),त्यानंतर शिवशक्तीमिलन (अर्धचंद्रकोर-क्रिसेंट चंद्र),त्यानंतर महानाद ( ह अक्षर अर्धे केल्यावर नांगरासारखा आकार),त्यानंतर व्यापिकाशक्ती ),(अंजरेषा) (एक वक्र रेषा अक्षरावर दाखवितात - अंजरेषा),जेथे शक्ती निर्मितीच्या वेळेस प्रकट झाली, त्यानंतर समानी,त्यानंतर उन्मनी अश्यारीतीने सात करणस्वरूपे सांगितली जातात. उन्मनीचे  दोन प्रकार आहेत - १) निर्विकल्प २) वर्णावळी - माळाजपाने (वर्णजप) प्राप्त,पूर्णचंद्राच्या परीघावर सहस्त्रात असलेली कनकला मालिनी (मुक्ती) हि सतरावी कला आहे असे समजतात.

समास्ते तस्यान्त: शशपरिरहित:

शुध्दसंपूर्णचन्द्र:स्फुरज्जोत्स्त्राजाल: परमरसचयास्निग्धसंन्तानहासि ।

त्रिकोणं तस्यान्त: स्फुरति च सततं विद्द्युदाकाररूपं तदन्त:

शून्यं तत् सकलसुरगणै: सेवितत्र्जातिगुप्तम् ।।४१।।

त्या (सहस्त्रात) कमळात एक पूर्णचंद्र आहे,त्यातून येणारा प्रकाश अमृतधारा असाव्यात तसा आहे (प्रकाश उष्णतारहित आहे- तसेच तो आनंददायी आहे) तेथे कशाचेच अस्तित्व नाही अर्थात ते मोकळे आकाश आहे,त्यात एक तेजाने चमकणारा त्रिकोण (अ-का-थ) (अमाकाल) आहे,ज्यात एक तेजोमय शून्य आहे ज्यास शून्याचेशून्य (महाशुन्य) म्हणतात (ज्यात तत्वाचा लय होतो त्यास शून्य असे म्हणतात उदा: वायूचा लय होतो ते पाचवे शून्य आहे,अशी सात शून्ये आहेत असे समजले जाते) ते स्थान देवांचे कार्य स्थान आहे.

काहिंच्या मते चंद्रमंडलाखाली अंतरात्मा आहे,तेथे सूर्य-चंद्र मंडळ असून त्यावर महावायू असून ब्रह्मरंध्र आहे,त्या रंध्रात (हंऽसा:-मधील)विसर्ग आहे जे ब्रह्मस्थान आहे,त्यावर देवी शंखिणी असून उत्पत्ती-स्थिती-लय करणारी शक्ती आहे.

सृगुप्तं तद् यत्नादतिशयपरमोदसन्तानराशे: परं कंन्द

सूक्ष्मं सकलशशिकलाशुध्दरूपप्रकाशम् ।

इह स्थाने देव: परमशिवसमाख्यानसिध्द: प्रसिध्द:

स्वरूपी सर्वात्मा रसविरसमितोऽज्ञानमोहान्धहंस: ।।४२।।

योगी पूर्ण शुध्द झाल्यावर येथे प्रवेश करतात,हे शून्य गुप्त व सूक्ष्मातीअतीसूक्ष्म आहे,येथे प्रवेश करण्यासाठी योग्यांना ध्यानयोगाने बराच काल व प्रयत्न करून यश मिळते,हे शून्य (महाशुन्य) अंतिम आहे असे समजले जाते,येथे अमाकला व निर्वाण कला दोन्ही आहेत असे म्हणतात,(अमाकला जी सोळावी कला आहे - जेथून अमृत वर्षाव होतो,निर्वाण कला - मुक्तीचे व्दार) (सतरा कला आहेत त्यातील सतरावी कला निर्वाण कला आहे) येथे परमशिवस्वरूप आहे जे सर्वांचे आत्त्मरूपच आहे,जेथे रस(संसारिक बंध) व विरस (मोक्ष-मुक्ती) दोन्ही आहे (कारण येथे शिवशक्ती मिलन आहे) सोळाव्या कलेपर्यंत अर्थात पंधरावर्ण कलांचा योगमार्गाने लय झाला आहे.

सुधाधारासारं निरवधि विमुञ्चन्नतितरां यते:

स्वात्मज्ञानं दिशति भगवान् निर्म्मलभते: ।

समास्ते सर्वेश: सकलसुखसन्तानलहरी परीवाहो

हंस:परम इति नाम्ना परिचित: ।।४३।।

सग्दुरु यतीस (यती - ज्याने सर्वसंग (संसारिक-मोहाचा) परित्याग करून संन्यास घेतला आहे असा साधक) त्यास जीव-ब्रह्म ऐक्याचा मंत्र समजावीत आहेत,जो मंत्र हा हंऽसा-परम (परमहंस) म्हणून ओळखला जातो (उच्चपातळीचा साधक गगनात (मुर्ध आकाश) ध्यानस्त होतो तेव्हा त्यास परमहंस म्हणतात) हा मंत्र ऐकताना गुरूच्या मुखातुन साधकास चंदेरी (चंद्रकिरण) किरणांचा झोतच पडत आहे व जो अमृतमय आहे असे वाटते कारण ह्याने सर्व अज्ञान,अंधकार व माया नाहिशी झाल्यासारखे वाटते,त्यांचे परत-परत येणारे शब्द जणू अमृत धाराच होत.हा ब्रह्ममंत्र म्हणून सुध्दा ओळखला जातो. ह्या मंत्रास तारक ब्रह्म मंत्र असे सुध्दा म्हणतात,हा मंत्र जीवात्मा-परमात्मा ऐक्य करणारा आहे,सहस्त्रात चंद्रमंडल आहे तेथील त्रिकोणाच्या परिघावर गुरुचे (गुरु अर्थात परमात्माशिव) स्मरण करावे,काहींच्या मते तेथे विसर्ग अर्थात दोन बिंदू आहेत बिंदूच्या मोकळ्या जागेत ध्यान करावे,कारण शक्ती हि बिंदू व विसर्ग (शिव-बिंदू,विसर्ग-शक्ती) अशी आहे,अर्थात हंऽसा: मंत्रातील दोन बिंदू,तेथे शिव हे सर्वेश्र्वर आहेत.(वसर्ग जणू अहं -ते मीच आहे असे ज्ञान देतो) कमळाच्या पाकळया जणू गुरुचरणापाशीच (ह्यास गुरुकमळ असे म्हणतात ज्यास बारा पाकळ्या आहेत जे सहस्त्रकमळांखाली

चिकटलेले आहे) आहेत,त्रिकोणातील त्या स्थानावर निर्वाणकला सुध्दा आहे,जी मुक्तीदायक आहे,(निर्वाण कलेस-व्यापिनी शक्ती असे सुध्दा म्हणतात,तिची खाली जाणारी बाजू (अधोमुख) हि अमाकाल(हिला सोळावी कला म्हणतात) आहे,जी निर्मिती शक्ती आहे व वर जाणारी बाजू निर्वाण कला होय-निर्वाण कलेस सतरावी कला असे सुध्दा म्हणतात,शक्तीची अशी दोन्ही रूपे आहेत.(कमळाच्या पाकळ्या अधो-खाली उघडणे व ऊर्ध्व-वर उघडणे) शक्ती गुरूंच्या (शिव) वक्षावर स्थित आहे), ह्या त्रिकोणाच्या परीघावर (गुरूंचे) ध्यान केल्याने कैलासात (शिवांचे स्थान) गेल्याप्रमाणे आहे,ह्या मार्गास ब्रह्मवर्तमार्ग (परब्रह्माकडे जाणारा मार्ग ) असे सुध्दा म्हणतात.जो अतिशय कठीण उपासनेने प्राप्त होतो.

शिवस्थानं शैवा: परमपुरुषं वैष्णवगणा

लपन्तीति प्रायो हरिहरपदं केचिदपरे ।

परं देव्या देवीचरणयुगलाम्भो जरसिका मुनीन्द्रा

अप्यन्ये प्रकृतिपुरुषस्थानममलम् ।।४४।।

ह्या स्थानास उपासकाच्या प्रमाणे निर्वाण स्थान म्हणतात,देवी भक्त ह्यास देवी स्थान,शिव भक्त ह्यास शिवस्थान,विष्णूभक्त ह्यास वैकुंठ,हरीहर भक्त ह्यास कैलास-वैकुंठ,तर इतर काही ह्यास प्रकृती-पुरुष स्थान असे म्हणतात.म्हणून हे सर्वदेवांचे स्थान आहे.

इदं स्थानं ज्ञात्वा नियतनिजचित्तोनरवरो न

भूयात् संसारे पुनरपि न बध्दस्तिभुवने ।

समग्रा शक्ति: स्यान्नियतमनस्तस्य कृतिन: सदा

कर्तुं हर्तुं स्वगतिरपि वाणी सुविविमला ।।४५।।

येथे पोहोचलेला योगी सर्व बंधनातून मुक्त असतो,त्यास पुनर्जन्म नसतो,सर्वशक्ती त्याच्या जवळ असतात,त्याच्या इच्छेने सर्व घडू शकते (पण त्यास संसारिक गोष्टी नकोच असतात),त्याची वाणी मधुर व लाघवी असते.

अत्रास्ते शिशुसूर्यसोदरकला चन्द्रस्य सा

षोङशी शुध्दा नीरजसूक्ष्मतत्नूशतधाभागैकरूपा परा ।

विद्युत्कोटिसमानकोमलतनूर्विद्योतिताधोमुखी

पूर्णानन्दपरंपरातिविमलत्पीयूषधाराधरा ।।४६।।

येथे एक उत्तम कला आहे,अर्थात चंद्राची सोळावी कला (अमाकला),ती अतिशय शुध्द आहे व उगवत्या सूर्यासारखी तेजस्वी आहे,कमळांच्या पाकळ्याच्या दोऱ्याच्या टोकाच्या शंभराव्या भागापेक्षा बारीक आहे,तीची प्रभा एककोटी विजांचमकाव्या त्यासारखी मोहक व सुंदर आहे,तिचे मुख खाली वळलेले आहे,तिच्यातून ब्रह्मस्वरूपातून येणारे अमृत सतत येते (किंवा परम व परा मिलनाचे अमृत हिच्यातूनच येते)

निर्वाणाख्यकला परा परतरा सास्ते तदन्तर्गता

केशाग्रस्य सहस्त्रधविभजितस्यैकांशरूपा सति ।

भूतानामधिदैवतं भगवति नित्यप्रबोधोदया

चन्द्राध्दांग्ङसमानभग्ङुरववा सर्वाकर्तुल्यप्रभा ।।४७।।

त्यामध्ये निर्वाणकला आहे जी उत्तमातील उत्तम आहे,(अमाकालपेक्षा उत्तम) ति केसाच्या टोकाचे हजार भाग केले,त्यापेक्षा सूक्ष्म आहे,ती चन्द्रकोरीसारखी आहे,ती नेहमी असणारी भगवति आहे,हि देवतास्वरूप असून नेहमी असणारी भगवती आहे,ती उच्च ज्ञान देणारी तिची प्रभा अनेक सूर्य (बारा) एकाच वेळी प्रकाशित झाले तर जशी दिसेल तशी आहे (अर्थात रक्तवर्णी),चन्द्रमंडळात जशी सोळावी कला-अमाकला तशीच हि सतरावी आहे,सदशिवांची ती सर्वात प्रिय (जणु हृदयच) आहे.

एतस्या मध्यदेशे विलसति परमापूर्वनिर्वाणशक्ति:

कोट्यादित्यप्रकाशा त्रिभुवनजननी कोटिभागैकरूपा ।

केशाग्रतस्यातिसूक्ष्मा निरवधिविगलतप्रेमधाराधरा सा

सर्वेषां जीवभूता मुनिमनसि युदा तत्वबोधं बहन्ती ।।४८।।

त्याच्यामध्ये ( निर्वाणकलेच्या मधील जागेत मध्याच्या थोडेवर ) अतिशय उत्तम व सुंदर अशी निर्वाण शक्ति (अपूर्वशक्ती) आहे,तिचे तेज कोटी सुर्यांसारखे आहे,हि तिन्ही जगांची (त्रिलोक) माता असून,ती

अतिशय सूक्ष्म आहे.केसाच्या टोकाचा एककोट्यांशावा भाग होय.(ह्यास पराबिंदु असे सुध्दा म्हणतात) तिच्यातुन सतत चैतन्य वाहात असते,तीच संताच्या व योग्यांच्या मनात सत्य वाहुन नेणारी आहे (सत्यदर्शन घडते ते तिच्या मुळेच) जी सर्वाआधी प्राकट झाली,जेथे शिव-शिवा असा भेद नाही.ब्रह्मस्वरूपासारखीच हि आहे.हि सूर्य-चन्द्र-अग्नी मंडलाच्या वर आहे (नाद तमोगुणाच्या प्रभावाने अव्यक्त-निबोधिका (अग्नी-ज्ञान),रजोगुणाच्या प्रभावाने शब्द (चन्द्र-इच्छा-अमाकाल स्थान) व सत्वगुणांच्या प्रभावाने बिंदु (सूर्य-क्रिया) स्वरूप आहे व त्यानुसार कार्य आहे,जोच तेथील त्रिकोण होय) कारण येथे फक्त परमानंद आहे जो कुंडलिनी अनुभवते,जीवांची प्रथम अवस्था येथेच आहे असे समजले जाते.

तस्यामध्यान्तराले शिवपदममलं शास्वतं योगीगम्यं

नित्यानंदाभिधानं सकलसुखमयं शुध्दबोधस्वरूपम् ।

केचिद् ब्रह्माभिधानं पदमिति सुधियो वैष्णवं तल्लपन्ति

केचिध्दंसांख्यमेतत् किमपि सुकृतिनो मोक्षमात्मप्रबोधम् ।।४९।।

त्यामध्ये शिवाचे परमस्थान आहे,जे मायारहित आहे,योगीजन येथेच नित्यानंदाचा अनुभव घेतात,सर्वप्रकारच्या आनंदाचे हे ठिकाण आहे व शुध्द ज्ञान आहे (शुध्द ज्ञान ते हेच),काही ह्यास ब्रह्मपुरी,हंस:,वैकुंठ,आत्मज्ञान होते अशी जागा,मुक्तीचे व्दार असे म्हणतात.येथे काळाचा महिमा चालत नाही,हे शक्तीचे कुलस्थान किंवा मूळस्थान आहे (येथे सृष्टीचे अस्तित्व संपते,ह्या स्थानाचे वर्णन शब्द,मनाने करणे शक्य नाही,ह्यास पराबिंदु असे सुध्दा म्हणतात ह्यात शिव बिंदुच्या मधील जागा आहे व बिंदूचा गोल हे शक्तीतत्व आहे जणु शक्तीपूर्णरुपात आहे,हीच परमकुंडली आहे असे समजले जाते,म्हणून ह्यास सत्यलोक असे सुध्दा म्हणतात,हे स्थान सहस्त्रदलातील कमळाच्या परिघावरील त्रिकोणाच्या आत आहे.आत्मज्ञान होण्याचे हेच ठिकाण आहे.

## सहस्त्रदल संक्षिप्त

सहस्त्रदल कमळात चन्द्रमंडल आहे,त्यात अंतर्गत शुध्द निर्मल स्थिती आहे,तेथे जणु स्निग्ध भावाचा ओलावा आहे,अर्थात चन्द्रकिरणांचा प्रकाश तसा आहे,त्या चन्द्रमंडळावर अंतरात्मा (गुरु-शिव) आहे,खरेतर तेथे सूर्यमंडल चंद्रमंडल स्वरूपात  आहे,तसेच तेथे महावायू असून तेथे ब्रह्मरंध्र असल्याचे समजते.त्या रंध्रात विसर्ग (:) आहे,अर्थात नित्यानंद निरंजन आहे,त्याच्यावर असलेली शक्ती शंखिनी

आहे जि सृष्टीचे स्थित्यंतर घडवुन आणते,तेथील चंदमंडलात त्रिकोणात सतत विज चमकल्यासारखे (स्फुरण आहे) वाटते,त्यात परमशून्य (त्रिकोणाच्या मध्यावर परमबिंदु) आहे ज्याचेच स्पुरण आहे.हेच ज्योतीबिंदूस्वरूप आहे जे गुणसूचकता दर्शविते,जेथे सर्व देव गुप्तस्वरुपात आहेत.तेथेच निर्वाणकला आहे.अर्थात तेथे सूर्यचंद्राच्या सकलकला समस्त कला षोडश कला आहेत,अर्थात पूर्णचन्द्र शुध्दप्रकाश तेथे आहे (व सूर्यतेजामुळे रक्तवर्णी झाक) .येथे जीव व शिव ऐक्य असल्याचे समजते.येथे अज्ञान संपते (अज्ञानमोह-अज्ञानी हंऽस: येथे नाश पावतो व ज्ञानसूर्य उगवतो)

क्रमाने पहिले तर महाशंखिणी नाडीच्या  वरच्या बाजूस चन्द्रमंडल (सहस्त्रदल कमळात) त्यात त्रिकोणात गुप्त असलेली सतरावी निर्वाण कला,त्यावर गुरुस्थान (शिव) जे हंऽसा:च्यावर आहे,अर्थात हंऽसा: पर्यन्त जीव शिव भेद आहे (जेथे आत्मज्ञान होते ते त्यानंतर आहे.)

## कुंडलिनी

हूक्ङारेणैव देवीं यमनियमसमाभ्याशील: सुशीलो

ज्ञात्वा श्रीनाथवक्त्रात् क्रममिति च महामोक्षवर्त्मप्रकाशम् ।

ब्रह्मव्दारस्य मध्ये विरचयति सतां शुध्दबुध्दिस्वभावो

भित्वातलिग्ङरूपं पवनदहनयोराक्रमेणैव गुप्तम् ।।५०।।

ज्याचे मन पूर्ण शुध्द झाले आहे (फक्त आत्मस्वरूपाकडे आहे),अशा साधकाने योगमार्गाने (जो गुरुकृपेने त्यास समजला ) ज्याने शुध्द होऊन (गुरुकृपेने) मुक्तीचे व्दांर ज्याने उघडले,त्यासाठी त्याने अग्नी व वायूच्या मदतीने हृकार रूप अशी शक्ती मुलाधारातून लिंगाच्या जवळील बंद तोंड उघडून अदृश्य असलेली शक्ती ब्रह्मव्दारात (चित्रांणी नाडी) स्थित करावी.(हृदय चक्रातील ज्योतिरूप जीवात्मा मुलाधारातून ब्रहमरंध्राकडे नेणे व जीव व परमात्मा एकच आहे -जे गुरुकृपेने समजते)

भित्वा लिग्ङत्रयं तत् परमरसशिवे सूक्ष्मधाग्नि प्रदीपे

सा देवी शुध्दसत्वा तडिदिव विलसत्तन्तुरूपस्वरूपा ।

ब्रह्माख्याया: शिवाया: सकलसरसिजं प्राप्य देदीप्यते

तन्मोक्षाख्यानन्दरूपं घट्यति सहसा सूक्ष्मतालक्षणेन ।।५१।।

कुंडलिनी शक्ती-देवी तीनही लिंगांचा (स्वयंभू,बाण,इत्र लिंगे) भेद करून सर्वकमळात पोहोचते (ज्या कमळांना ब्रह्मनाडीतील कमळे असे म्हणतात) तेव्हा ती आपल्या पूर्णप्रभेत असते,त्यानंतर सूक्ष्म,कमळातील दोऱ्यासारखी व विजेसारखी असलेली ती ज्योतिरूप शिवतत्वास सहस्त्रात जाऊन मिळते,तेव्हा आश्र्चर्यकारक व अचानकपणे मुक्तीचा आनंद देते.

नीत्वा तां कुलकुंडलीं लयवशात् जीवेन सार्ध्दं

गुधीर्मोक्षे धामनि शुध्दपद्मसदने शैवे परे स्वामिनी ।

ध्यायेदिष्टफलाप्रदां भगवतीं चैतन्यरूपां परां योगीन्द्रो

गुरुपादपद्मयुगुलालम्बी समाधौ पत: ।।५२।।

मूलाधार चक्रातून सहस्त्राकडे जाताना स्वयंभू लिंगाजवळ (मुलात)वैखरी,बाणलिंगाजवळ(हृदयात) मध्यमा,इत्रलिंगाजवळ (भृकुटीत) पश्यन्ती व सहस्त्रात पराबिंदूत परा अशी तिची रूपे आहेत,कमळातून जाताना ती तेथील स्थानाप्रमाणे स्वरूप घेते व आनंद निर्माण करते व शेवटी निष्कल आनंद सहस्त्रात पराबिंदूत शिवांच्या मिलनाने निर्माण करते.

बुध्दीमान असा योगी ज्यावर गुरुची कृपा आहे व ज्याची गुरुचरणावर श्रध्दा आहे,त्याने जीवात्म्या बरोबर कुंडलिनी सहस्त्रात तिच्या परमस्थानी अर्थात सहस्त्रात पराबिंदूत जेथे शिवस्वरूप आहे तेथे नेऊन समाधिस्त व्हावे,हयास्थानी सर्व इच्छा पूर्ण होतात कारण हे तिचे कुलस्थान अर्थात मुलस्थान आहे.योग्याने तेथे पूर्ण अंतर्मुख व्हावे.

लाक्षामं परमामृत परशिवात् पीत्वा पुनः कुंडलीं

नित्यानंदमहोदयात् कुलपथान्मुले विशेत सुंदरी ।

तव्दिव्यामृतधारया स्थिरमति: सन्तर्पयेद् दैवत्रं योगी

योगपरम्पराविदितया ब्रह्माण्डभाण्डस्थितम् ।।५३।।

परमशिवतत्वापाशी सुंदर अशी ती कुंडलिनी अमृत प्राशन करते (काहींच्या मते हे मासिकपाळीच्या रक्तामुळे लालरंगाचे आहे),त्यानंतर ती परत मूलाधार चक्राकडे जाते,योगी मनाची अत्यंत स्थिर व निर्मळ अवस्था तेव्हा प्राप्त करतो,सर्व इष्ट देवतांचे त्या सतत होणाऱ्या अमृत वर्षावाने योगी पूजन

करतो,त्यास शिवशक्ती एकच असल्याचे ते दिव्य गुरुपरंपरागत ज्ञान प्राप्त होते.वर जाताना कुंडलिनीची प्रभा असते तीच कुंडलिनी परत येताना अमृतमयी असते.

ज्ञात्वैतत् क्रममूत्तमं यतमना योगीयमाद्ध्येर्युत:

श्रीदीतागुरुपादपद्ममयुगालामोदप्रवाहोदयात ।

संसारे न हि जन्मते न हि कदा संक्षीयते संक्षये

नित्यान्दपरम्परात्रिमुदित: शान्त सतामग्रणी: ।।५४।।

गुरूच्या कृपेने व उपदेशाने योगमार्गक्रमण करणारा ज्ञान प्राप्त योगी जन्मरहित व सतत आनंदमय (नित्यानंद) स्थिती प्राप्त करतो

योऽधीते निशी सन्ध्यायोरथ दिवा योगी स्वभावस्थितो

मोक्षज्ञाननिदानमेतदमलं शुध्दञ्च गुप्त परमं ।

श्रीमतश्रीगुरुपादपद्ममयुगुलालम्बी

यतान्तर्मनास्तस्यावश्यमभीष्ठदैवतपदे चतोनरीनृत्यते ।।५५।।

गुरुचरणाशी श्रध्दा असलेला योगी नक्कीच मनाच्या पूर्ण एकाग्रतेने पूर्णज्ञान प्राप्त करतो जे ज्ञान शुध्द,दोषरहित व गुप्त आहे,गुरुकृपेने त्याचे मन आपल्या इष्टदेवतेच्या पायाशी आनंदाने रममाण होते.


Bindu
Sahasrara
Visarga
Brahma
Randhra
Brahma
Makara
Ajna
Vishuddha
Manas
Hrit
Anahata
Chitrini
Susumna nadi
Vajra
Manipura
Svadhisthana
Lakshmi nadi
Saraswati nadi
PKYC
Muladhara Chakra

|| समाप्त ||